


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका








महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

○

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २९६

जानेवारी - फेब्रुवारी - मार्च २००१

○

**संपादक**

ह. ल. निपुणगे

○

**संपादन समिती**



○

**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रोड, पुणे - ४११ ०३०.

दूरध्वनी : ४४७ ५९ ६३.

अनुक्रमणिका

# - अनुक्रमणिका -






:क-प्रकाशक : डॉ. वि. भा. देशपांडे, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रोड, पुणे ४११ ०३०.

मुद्रणस्थळ : जंगम ऑफसेट प्रा. लि., २५/१०, नांदेड फाटा, पुणे ४११ ०४१.

मुखपृष्ठ रचना : स. म. जंगम, पुणे.

मुखपृष्ठ छायाचित्र : ना. धों. महानोर छायाचित्रकार : अरुण शिंदे

संगणकीय अक्षरजुळणी : लीनता प्रकाशन आणि मुद्रणसेवा, पुणे.

मूल्य : रुपये ३०/- वार्षिक वर्गणी संस्थांसाठी : रु. १००/-

आजीव सदस्य शुल्क : रु. ५००/- वार्षिक सदस्य शुल्क : रु. ५०/-

अंक क्र.२९६ : जानेवारी २००१ ते मार्च २००१

*(१ एप्रिल २००१ पासून आजीव सदस्य शुल्क रु. १०००/- करण्यात आले आहे.)*




परिषदेच्या विश्वस्तपदी **न्यायमूर्ती प्र.ना.बेहेरे** यांची आणि कार्यकारी विश्वस्तपदी **श्री.वि.वि.घाणेकर** यांची नियुक्ती झाली आहे. त्यांचे हार्दिक स्वागत.

- संपादक

# संपादकीय



**ह. ल. निपुणगे**

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा माझ्या संपादकीय कारकिर्दीचा हा अखेरचा अंक वाचकांना सादर करताना मनात संमिश्र भावना आहेत. या संपादकीय आनंददायी कामाला आपण आता मुकतो आहोत याचे दुःख होते आहे तर दुसऱ्या बाजूला आपण आता या जबाबदारीतून सुटतो आहे याचा आनंदही वाटतो आहे. याची अनेक कारणे आहेत. तीन वर्षांपूर्वी मी या पदावर निवडून आलो. त्याआधी एक वर्षभर श्री. शंकर सारडा राजीनामा देऊन निवृत्त झाल्यावर मी संपादक होतो. मी निवडून येऊन पुन्हा संपादक व्हावे असे अनेकांना वाटत होते. त्यामुळे प्रस्थापितांच्या विरोधात निवडणूक जिंकून मी पुन्हा संपादक झालो आणि माझ्या परीने हे काम जास्तीत जास्त चांगले करण्याचा प्रयत्न केला. त्यात कितपत यश आले हे सभासदांनी-वाचकांनीच ठरवावयचे आहे.

संपादनात माझी दृष्टी थोडी वेगळी होती. मी स्वतः प्रकाशक आणि मुद्रण व्यवसायातील चांगला जाणकार असल्याने अंक सौठवपूर्ण - देखणे निघावेत असेच मला वाटले आणि त्याप्रमाणे मी प्रयत्न केला. काहींना हे देखणेपण आवडले, काहींना नाही. संपादनात मी नाना विषय हाताळले. चरित्रलेखन विशेषांक, दशकातील कथाकार विशेषांक, आता नुकताच प्रकाशित झालेला पु.ल.देशपांडे विशेषांक हे वाचकांना आवडले. पण पत्रिकेच्या नेहमीच्या अंकातही मी सर्वांना आवडेल असे साहित्य दिले. वाचकांनी आपण संपादित केलेले अंक वाचावेत याद्दृष्टीने वाचनीय मजकूर / साहित्य देण्याचा प्रयत्न केला.

विद्यापीठांतून वेगवेगळ्या विषयांवर प्रबंध सादर करून डॉक्टरेट मिळविलेल्या परंतु अशा प्रबंधांची पुस्तके प्रकाशित न झालेल्या प्रबंधकारांना मुद्दाम आवाहन करून त्यांच्या प्रबंधांची रूपरेषा सादर केली. ती अनेकांना आवडली आणि उपयुक्तही ठरली.

दिवाळी अंकांतून प्रसिद्ध होणाऱ्या ललितेत्तर वैचारिक लेखनाची सूची गेली चार वर्षे मुद्दाम तयार करवून घेऊन प्रसिद्ध केली. ही सूचीही अनेकांना आवडली. कोण कोणत्या विषयावर लिहू शकतो आणि व्याख्यान देऊ शकतो यासाठी ही सूची चांगली मार्गदर्शक ठरली.



अनुक्रमणिका

माझ्या दृष्टीने अनेक उपयुक्त लेख मी मुद्दाम लिहवून घेऊन म.सा.पत्रिकेत प्रकाशित केले. त्यातील ज्योत्स्ना देवधर, वाळ गाडगीळ, य.दि.फडके यांच्या साहित्यावरील लेख अनेकांना आवडले.

अनेकांनी पत्रे लिहून माझ्या संपादकीय दृष्टीचा गौरव केला. पण टीकाकारही भेटले. मी अंकाच्या संपादनाची साहित्यिक उंची गाठू शकलो नाही असे काहींनी म्हटले. परंतु साहित्यिक उंची मोजण्याची त्यांची फूटपट्टी कोणती होती हे मला समजले नाही. साहित्यिक उंची म्हणजे नेमके काय हे खरे तर त्यांनी सविस्तर लिहून पाठविले असते तर अशा लेखाला - पत्राला मी पत्रिकेत अवश्य प्रसिद्धी दिली असती. परंतु काही गोष्टी फक्त तोंडीच वोलता येतात. त्या लिहिता येत नाहीत हेच यावरून कळते.

वैद्यकीय व्यवसायात असलेले एक वाचक मला एकदा वाटेत भेटले, ते म्हणाले, 'हल्ली मी पत्रिकेचे अंक वाचतो. काहीतरी वेगळे वाचायला मिळते.' यावरून मी संपादित केलेले अंक वाचक वाचीत होते हे मला कळले.

पत्रिकेच्या संपादकासाठी म.सा.प. घटनेत कोणतीही मार्गदर्शक तत्त्वे दिलेली नाहीत. त्यामुळे जो कोणी संपादक होईल तो स्वतःच्या दृष्टीने अंकाची योजना आखतो. संपादकीय सल्लागार मंडळ असते. त्यांचे योग्य ते मार्गदर्शनही होते. पण अखेरचा निर्णय मात्र संपादकाचाच असतो. त्यामुळे संपादकाच्या एकूण कुवतीनुसारच अंक संपादित होतात आणि त्यासंवंधी वेगवेगळे मतभेद असू शकतात. त्या मतभेदांसंवंधी मनमोकळी चर्चा व्हायला हवी. ही चर्चा मुद्देसूद हवी. तशी चर्चा कधीही झाली नाही. याचा मात्र खेद वाटतो.

पण यावेळीही मी प्रस्थापितांच्या विरोधात निवडणूक लढवून प्रमुख कार्यवाहपदी निवडून आलो त्याअर्थी माझेही काही चाहते आहेत हे नक्की.

यापुढे पत्रिकेचे संपादकपद पूर्वीप्रमाणे निवडणुकीने न होता, कार्यकारी मंडळ पत्रिका संपादक निवडणार आहे. घटनेमध्ये तशी दुरुस्ती झाली आहे. कार्यकारी मंडळ योग्य संपादकाची निवड करील असा विश्वास वाटतो. भावी संपादकांना माझ्या मनःपूर्वक शुभेच्छा !

या संपादनाच्या काळामध्ये माझ्या हातूनही काही चुका झाल्या असतील. त्यावद्दल मी दिलगीर आहे. काही व्यक्ती दुखावल्या गेल्या असतील. त्यांनी मला क्षमा करावी.

परिषदेचे सर्व पदाधिकारी, कार्यकारी मंडळाचे सदस्य आणि परिषदेच्या सर्व सभासदांचा आणि मला सहकार्य दिले त्या सर्वांचा मी अत्यंत आभारी आहे.

❑❑



अनुक्रमणिका






# पुल : मराठी संस्कृतीचा एक आनंदयात्री



डॉ. गं. ना. जोगळेकर

मराठी संस्कृतीच्या दृष्टीने पुल हे एक आनंदयात्री आहेत. आनंदासाठी त्यांनी सगळे काम केले आहे. त्यांनी आनंद दिला, आनंद घेतला आणि आनंदातच ते रमले. 'आनंदाचे डोही आनंद तरंग' असे त्यांच्याबद्दल सहज म्हणता यावे, असे पुलंचे गेल्या ५० वर्षांत काम झालेले आहे. आता पुलंसारखी काही माणसे चांगले नशीब घेऊन येतात. त्यांच्या पहिल्यावहिल्या लेखनाचीसुद्धा चांगली दखल घेतली गेली आहे. हे लेखन म्हणजे 'अण्णा वडगावकर' हे व्यक्तिचित्र. ते त्यावेळी गाजलेल्या, वडोद्याहून निघणाऱ्या 'अभिरुची' मासिकामध्ये प्रकाशित झाले. त्याआधी त्यांनी फर्ग्युसन कॉलेजच्या वार्षिकामध्ये लेखन केले होते. त्याची सुद्धा दखल केवळ त्या वेळच्या विद्यार्थ्यांनीच नव्हे तर रा.श्री.जोगांसारख्या प्राध्यापकांनीही घेतली होती. आपल्या पहिल्या-वहिल्या लेखनाची दखल घेतली जावी आणि नंतरच्या प्रत्येक लेखनावर चर्चा व्हावी हे भाग्य ज्या थोड्याफार लेखकांच्या वाट्याला येते त्यामध्ये पुलंना नक्कीच अग्रस्थान आहे. 'माझी उपेक्षा झाली. मी इतके लिहिले पण माझी दखल कोणीच घेतली नाही' अशा प्रकारची तक्रार अनेकजण करू शकतील. पण पुलंकडून अशी तक्रार कधीही होणार नाही. कारण त्यांना तो अनुभव नाही.

दुसऱ्या एका कारणासाठी ते भाग्यवान आहेत. ते कोणते ? राम गणेश गडकऱ्यांचा मृत्यू ज्या वर्षी झाला त्याच वर्षी पुलंचा जन्म झाला. हा एक योगायोग आहे. असे योगायोग नियतीने यापूर्वीही केले आहेत. उदा. वासुदेव बळवंत फडके यांचे निधन १८८३ मध्ये झाले. त्याच वर्षी स्वातंत्र्यवीर सावरकरांचा जन्म झाला. तसाच हाही चांगला भाग्ययोग आहे. हा भाग्ययोग केवळ पु. ल. देशपांडे या एका व्यक्तीपुरता नाही; तर तो आहे पु. ल. देशपांडे आणि ग. दि. माडगूळकर या दोघांच्या बाबतीत ! दोघेही एका महिन्याच्या अंतराने १९१९ मध्येच जन्मले. दोघांनाही गडकऱ्यांचा वारसा मिळालेला आहे. दोघांनीही गडकऱ्यांबद्दल भरभरून लिहिलेले आहे. पुलंनी तर प्रभावीपणे गडकऱ्यांच्या वाङ्मयाचे समग्र दर्शन घडविले. त्यांचे पाठांतर खूप होतेच. 'कृष्णाकाठी कुंडल आता पहिले उरले नाही' असा कार्यक्रम त्यांनी केला. गदिमांनीही त्यांच्या ज्या पहिल्या वहिल्या कविता आहेत त्यांत, 'मायबोलिचा किल्ला आता, द्यावा कोणा करी ? तेवढे सांगा ना गडकरी' अशी अप्रतिम कविता केली होती. गडकऱ्यांबद्दल आदरभाव दाखवणारी ही कविता आहे. त्यानंतरही गडकऱ्यांच्या पद्धतीचे, त्यांनी बरेच लिखाण केले. कथात्मक काव्य हे गडकऱ्यांच्या पद्धतीने गदिमांनीही केले. एकाने काव्याचा वारसा जपला, दुसऱ्याने नाटकाचा वारसा जपला आणि दोघांनीही विनोदाचा वारसा जपला. गदिमा हेसुद्धा उत्तम विनोदी लेखन करणारे लेखक होते आणि पुल तर काय, त्यांच्या प्रत्येक लेखनात विनोदाचा सहज स्पर्श तरी असतो नाहीतर विनोदाला प्राधान्य तरी असते; हे आपल्याला माहीत आहे. दोघांनीही नाटके लिहिली आहेत पण गदिमांनी



अनुक्रमणिका








रीतसर जे 'युद्धाच्या सावल्या' नाटक लिहिले ते फारसे चालले नाही. राम जोशींवर जे नाटक लिहिले ते जेव्हा अण्णांच्या (म्हणजे व्ही.शांतारामांच्या) पाहण्यात आले तेव्हा त्यांनी त्यावर चित्रपट काढायचे ठरवले. तिथून मग गदिमा हे नाटककार न होता पटकथाकार झाले आणि त्यांच्या पटकथांमध्ये ओतप्रोत नाट्य भरलेले असते. त्यामुळे नाटकाचा रंग हा गदिमांच्या साहित्यातही भरपूर उमटलेला आहे. आणि पुलंचे नाट्यकर्तृत्व तर आपल्याला चांगले परिचयाचे आहे.

देवल असोत किंवा नंतरचे कुठलेही नाटककार असोत, गडकरी असोत, अत्रे असोत, खाडिलकर असोत किंवा वरेरकर असोत. प्रत्येकाचे जसे काही सामर्थ्य आहे तशा प्रत्येकाच्या काही मर्यादाही आहेत. त्या मर्यादा आहेत म्हणून त्यांच्या नाटकाला वैगुण्य किंवा काही कमीपणा येत नाही. ते त्यांचे वैशिष्ट्यच ठरते. पुल आणि गदिमा यांच्यात आणखीही काही साम्यस्थळे जाणवतात. गडकऱ्यांना दुःख होते की मी मॅट्रिक झालो पण पदवीधर होता आले नाही. त्यावेळचे सर्व लेखक हे पदवीधर असण्याला महत्त्व होते. तेच दुःख गदिमांना होते. ते मॅट्रिकही झाले नव्हते. १० वी किंवा ११ वीत असतानाच त्यांना संस्थानिक औंधकरांनी सांगितले की, तू आता कोल्हापूरला जा. तिथे तुला वाव आहे. गदिमा आणि पुल दोघेही उत्तम नकलाकार होते, कोल्हापूरमध्ये आणि चित्रपटसृटीमध्ये गदिमा 'नकलाकार औंधकर' म्हणूनच प्रसिद्ध होते; आणि पुलंमध्ये नकलाकार कसा जन्मजात ठसलेला आहे हे आपल्याला अनेकांनी सांगितले आहेच. पुलंचे शिक्षण पूर्ण झाले पण ते धडपणे नाही. वेगवेगळ्या वेळी त्यात खंड पडत गेला. प्रथम ते इंटर झाले. त्यानंतर त्यांनी वकिलीची परीक्षा दिली. पण त्यांनी कधी वकिली केली नाही आणि त्यांच्या लेखनात कुठे वकिली डावपेचही नाहीत. हे एक आश्चर्यच आहे. केवळ वडिलांना वाटत होते की आपल्या मुलाने वकील व्हावे, कारण त्याकाळी वकील असण्याला समाजमान्यता होती. म्हणून पुल वकील झाले, पण वकिली केली नाही. इस्माईल यूसुफमध्ये काही शिक्षण झाले, मग काही शिक्षण फर्ग्युसन कॉलेजमध्ये झाले. परत खंड पडला. मग कवी गिरीशांच्या घरी राहायचे आणि त्यांना मनसोक्त गाणी ऐकवायची या बोलीवर विलिंग्डन कॉलेजमध्ये ते एम.ए. साठी आले आणि इतर विद्यार्थ्यांच्या वह्या वाचून ते एम.ए. झाले आणि प्राध्यापक हे पद त्यांनी दोन-अडीच वर्षे सांभाळले. गदिमांप्रमाणे पुलंनाही शिक्षणाच्या बाबतीत फार सुखाचे वातावरण लाभले असे झाले नाही. याचे कारण काय तर ते दोघेही कुटुंबातील कर्ते मुलगे होते. भावंडांमधला मोठा मुलगा. त्यामुळे आईवडिलांच्या संसाराला हातभार लावण्यासाठी, लहानपणापासून पडेल ते काम त्या काळातील मोठ्या मुलाला करावे लागे. पुलंनी एकीकडे आपले शिक्षण चालू ठेवले व एकीकडे मिळतील त्या बारीकसारीक नोकऱ्या करून घराला हातभार लावला. धाकट्या भावंडांची शिक्षणे केली. गदिमांनी सुद्धा सर्व धाकट्या भावंडांची शिक्षणे केली. यापैकी व्यंकटेश माडगूळकर यांचा अपवाद कारण लहानपणापासूनच ते घराबाहेर पडले होते. पण इतर धाकट्या भावांना, बहिणींना, मुलांना सर्व प्रकारचे उत्तम शिक्षण देण्याचा आनंद त्यांनी मिळवला तोही स्वतःचे शिक्षण झालेले नसताना. स्वतःबद्दल ते एवढेच म्हणत की, बाकी काही नसलो तरी मी, 'विद्या-पति' आहे ! (त्यांच्या पत्नीचे नाव विद्या होते.) आणि ते

साहित्यामधले गजानन होते.

साहित्यामधले हे दोघे मित्र योगायोगाने केवळ नाट्य आणि चित्रपटामुळे एकत्र आले. खरं तर ते एकत्र यायला काही कारणच नव्हते. पुलंचे सगळे लहानपण पार्ल्यात गेले आणि नंतर गिरगावात. गदिमांचे बालपण कोल्हापूर, सातारा किंवा सगळा दक्षिण महाराष्ट्र येथे आणि मग ते पुण्याला आले. पुलंही नंतर पुण्याला आले. त्यावेळी ही सर्व तरुण, खट्याळ माणसे अत्यंत हलाखीच्या परिस्थितीत राहत होती. कारण त्यावेळची मराठी चित्रपटसृष्टी ही पैसे बुडवण्याबद्दल अतिशय प्रसिद्ध होती. ५० हजार ते १ लाख रुपयांत चित्रपट निघत असे ! चित्रपटाची सामग्री अतिशय निकृष्ट प्रतीची असे. माणसे मात्र गुणी होती. कलाकार असो, तंत्रज्ञ असो, संगीताच्या क्षेत्रातली सगळी एकापेक्षा एक गुणी होती. आणि कुटुंबाप्रमाणे काम करणारी होती. त्यामुळे त्या प्रतिकूल काळात पुण्यात जे चित्रपट निर्माण झाले त्या तोडीचे मराठी चित्रपट गेल्या ४० वर्षांत निर्माण झाले नाहीत. जिथे 'पेडगावचे शहाणे' निर्माण झाला, 'ऊनपाऊस' निर्माण झाला, त्या काळात 'लाखाची गोष्ट' सारखा अत्यंत विनोदी, आणि 'गंगेत घोडं न्हालं' सारखा ज्याला अस्सल कॉमेडी म्हणता येईल, असे चित्रपट निर्माण झाले. त्यातच पुलंचे चित्रपट येतात. देव पावला, मानाचं पान, देवबाप्पा, दूधभात, घरधनी, नवरा बायको इ. पण 'गुळाचा गणपती' मुळे त्यांचे नाव या क्षेत्रात चिरस्थायी झाले. या माणसाने पैशाची पर्वा केली नाही. पैसे मिळतात म्हणून मुंबईला हिंदी चित्रपटात पळ काढला नाही. आपलं मराठीपण याबाबतीत त्यांनी टिकवले आणि पुलंनी कधी मी द्विपदवीधर आहे, एम.ए. झालेलो आहे. काही काळ का होईना 'प्रा.' झालेलो आहे असा टेंभा कधीही मिरवला नाही.

हे मला केव्हा जाणवलं, अगदी त्यांच्या पहिल्या प्रस्तावनेत. त्या प्रस्तावनेचा कोणीही उल्लेख केला नाही म्हणून मी करतो. १९५० मध्ये 'सुगंधी वीणा' नावाचे एक पुस्तक निघाले होते. हे पुस्तक लहानसेच आहे, पण त्यावेळची गाजलेली गदिमांची भावगीते, काही चित्रपट गीते आणि 'धुंद येथ मी स्वैर झोकतो मद्याचे प्याले' सारखी काही गाणी यांचा समावेश त्या पुस्तकात आहे आणि त्या सगळ्या गाण्यांचे स्वरलेखन म्हणजे संगीत, सुधीर फडक्यांनी दिले आहे. त्यामुळे उरलेल्या निम्म्या भागात स्वरलेखन आहे. असे ते पुस्तक योगायोगाने माझ्या हाती बेळगावच्या नगर वाचनालयात आले. त्याला प्रस्तावना पुलंची होती. ही तीन मोठी माणसे, ज्यांनी कर्तृत्वाचे डोंगर उभे केले, ती मला त्या पुस्तकाच्या निमित्ताने एकत्र भेटली आणि त्यात पुलंनी आपल्या या दोन तरुण मित्रांबद्दल, त्यांच्या गुणवत्तेबद्दल अगदी भरभरून लिहिले आहे. त्यांनी शेवटी असे म्हटले आहे की, पुस्तकाच्या प्रस्तावनेत लिहायचे म्हणून मी सुप्रसिद्ध संगीतकार सुधीर फडके आणि कविवर्य ग. दि. माडगूळकर असा त्यांचा उल्लेख करत आहे. नाहीतर एरवी बोलताना गदिमाची गाणी आणि सुध्याच्या चाली असे आपापसामध्ये म्हणत असतो. ही अशी जवळीक पुलंच्या प्रस्तावनेत मला दिसली आणि नंतर वेगवेगळ्या ३-४ ठिकाणी दिसत राहिली. मी आत्ता ज्या लेखाचा उल्लेख करणार आहे तोही अनेकांच्या म्हणजे मंगला गोडबोले किंवा स. ह. देशपांड्यांच्या



अनुक्रमणिका

वाचनात आला नसावा. १९५१ मध्ये 'मनोहर' मासिक (जे नंतर काही काळ साप्ताहिक म्हणून चालले.) वाङ्मयीन स्वरूपाचे मासिक होते आणि दर महिन्याला त्यात कोणत्या ना कोणत्या लेखकाचा सविस्तर परिचय जवळच्या कोणीतरी करून दिलेला असायचा. तर त्या वेळी एका अंकात गदिमांचा परिचय पुलंनी करून दिला होता. अगदी सचित्र होता. त्यांची पहिली वहिली मुलगी वर्षा हिचाही फोटो त्या लेखाच्या सोवत दिलेला मला आठवतोय आणि 'कथा, पटकथा, संवाद, गीते यांची परंपरा तूही चालवणार ना ?' अशी ओळ फोटोच्या खाली छापलेली आहे ! त्यामध्येसुद्धा गदिमा कोल्हापूरला कोणत्या अवस्थेतून पुढे आले. याचे अत्यंत उत्कट चित्र पुलंनी रंगवलेले आहे. तसे गदिमा अंगाने ऐसपैस होते आणि कोट, गांधी टोपी, धोतर या वेषामध्ये त्यांना कोणीतरी असे म्हणाले की, हा निपाणीचा तंबाखूचा व्यापारी वाटतो. पुलंनी यावर लिहिले आहे की, हे खरंच आहे. कारण एका तंबाखूच्या व्यापाऱ्याच्या दुकानाच्या ओट्यावरती ह्यांना रात्रीच्या मुक्कामाची परवानगी मिळाली होती. त्यांना कुठे राहायला जागा नव्हती. तेव्हा अशा या अवस्थेतून ही मराठी माणसे कलेमुळे पुढे आली. त्या ठिकाणी वसंतराव कामेरकर आले त्यामुळे त्यांची गाणी कोल्हापूरला ध्वनिमुद्रित झाली. त्या काळात महाराष्ट्राचे लाडके संगीतकार सुधीर फडकेही रंकाळ्याच्या काठाने वेकार फिरत होते तिथे त्यांची भेट झाली असा तो काळ पुलंनी या लेखात रंगविला आहे.

नंतर गदिमांचा परिचय त्यांनी आणखी एका निमित्ताने करून दिला. करून दिला म्हणण्यापेक्षा, मित्राच्या कर्तृत्वाबद्दल आनंद व्यक्त केला. गदिमांना जेव्हा ५० वर्षे पूर्ण झाली त्यावेळी प्रेस्टीज प्रकाशनच्या सर्जेराव घोरपड्यांनी 'गदिमा नवनीत' चा एक डवल क्राऊन आकाराचा ग्रंथ काढला होता. त्याला प्रस्तावना पुलंनी लिहिली होती. पुलंनी त्यात आमची पहिली भेट कुठे झाली ? हा प्रसंग रंगविला आहे. भानुविलास टॉकीजच्या त्या रेस्टहाऊसमध्ये म्हणजे आऊटहाऊसमध्ये झाली आणि तिथे पहिल्याच भेटीत काय काय घडले ? भांडाभांडी झाली, भजी खाणे झाले हे एकमेकांचे हाडवैरी आहेत का असे वाटत होते आणि त्याचवेळेला एकमेकांच्या गळ्यात गळे घालून कसे हासत होते, त्याचे वर्णन लिहिले आहे. ही सगळीच माणसे अद्‌भुत होती. हा काळ फार दूरचा नव्हे पण आता तो अनौपचारिकपणा, त्या प्रकारची सलगी, मैत्री दिसत नाही. आता माणसे जास्त व्यवहारी झाली आहेत. ती दूरदूर राहतात, जपून बोलतात, जपूनच चालतात, हिशोवीपणाने वागतात. अनौपचारिकपणा आणि अव्यवहारीपणा जुळून आला म्हणून ही अमर मैत्री जुळून आली.

हे दोघे खऱ्या अर्थाने गडकऱ्यांचे वारसदार आहेत. मराठी भाषा त्यांना वश झाली होती. त्यांना विनोदवुद्धी होती. त्यांच्या ठिकाणी नाट्य होते आणि काव्य तर होतेच होते. गदिमांच्या ठिकाणी ते निर्मितीच्या रूपाने होते आणि पुलंच्या ठिकाणी त्या काव्याची उत्तम जाण होती. म्हणून वाकी सगळ्या ठिकाणी 'सवकुछ पुल' असे त्यांनी केले. पण त्यातली गाणी मात्र त्यांनी गदिमांकडून लिहून घेतली. मग ती देववाप्पाची असोत, देव पावला किंवा गुळाच्या गणपतीची असोत. 'इंद्रायणी काठी' हा गदिमांचा अभंग आहे किंवा 'इथेच टाका तंवू' हे गदिमांचे काव्य आहे. अशी पुष्कळ

गाणी आपल्याला सांगता येतील. दुर्दैवाने ते मराठी चित्रपट पुनः पुन्हा पाहायला मिळत नाहीत. त्यामुळे आज केवळ त्यांचे शाब्दिक वर्णन करावे लागते. तो काळ प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांसमोर येत नाही. पण आमच्यासारखे काही प्रेक्षक तो काळ अनुभवलेले आहेत. त्यावेळेला प्रेक्षकांना मराठी चित्रपटांचे फार वेड होते. मला चित्रपटांचा बऱ्यापैकी नाद होता. त्यामुळेच मला त्या गोष्टी त्या त्या वेळच्या लक्षात राहिल्या. सोमवारपासून एस.एस.सी. ची परीक्षा होती तर मी शनिवारी दुपारी 'मानाचं पान' हा चित्रपट पाहिला होता. का? तर तो गदिमां आणि पुलंचा सिनेमा म्हणून. गदिमांची तर त्यात गाणी होतीच. पण पुलंचाही हा सिनेमा आहे आणि 'मानाचं पान' हा सिनेमा कदाचित पहिला मराठी सिनेमा असेल की, ज्यात बाबूराव पेंढारकर आणि वसंत ठेंगडी हे दोघे पहिलवान नायक आणि खलनायक होते. त्यांच्या कुस्तीचे प्रसंग त्यात आहेत. आणि ते खरे वाटतात. त्यात वसंत शिंदे हा खेड्यामधला एक शिंपी होता आणि तो आपली मनोराज्ये फक्त आपल्या गाण्यांतून, बोलण्यातून व्यक्त करायचा. 'तुझ्या गं दंडांत चोळी ऐन्याची' असे त्याच्या तोंडी एक गाणे आहे आणि 'कशासाठी सखे तू घरदार सोडलं माझं ठरल्यालं लगीन मोडलं गं' हे त्याच्या तोंडी गाणे आहे. आणि 'जिंकून फड आला माझा गं पैलवान' हे ललिता पवारच्या तोंडी गाणे आहे. असा तो अद्‌भुत सिनेमा, त्याचे दिग्दर्शक राम गबाले आहेत. असे उत्तम चित्रपट नंतर कधी पाहायला मिळाले नाहीत. ते निर्माण झाले नाहीत हा भाग तर वेगळाच पण जुने चित्रपट पाहायलाही कधी मिळाले नाहीत. हे त्या पिढीतील लोकांनी निर्माण केले आणि त्यावेळी विशीत असलेल्या आम्हाला ते डोळे भरून पाहायला मिळाले, कान भरून ऐकायला मिळाले आणि त्यांनी आमचे मन व्यापले.

असा हा पुलंसारखा लेखक पुढे वाढत चालला तेव्हा लक्षात यायला लागलं की, हा आणखी कुणाचा तरी वारसदार आहे. जेव्हा तो विनोदी लेखन करायला लागला आणि 'बटाट्याची चाळ' च्या लेखनामुळे तो पुढे आला तेव्हा असे लक्षात आले की, एकीकडून हा लेखक चिं. वि. जोशींचा वारसदार आहे, त्यांचा ऋणाईत तर आहेच पण दुसरीकडून आचार्य अत्र्यांचाही अत्यंत जवळचा चाहता आहे. दोघांचाही परिणाम पु.लं.च्या लेखनावर झाला आहे. आपल्याला माहीत आहे की, चिं.वि.जोशींनी चिमणरावमय असे लेखन केले पण त्याच चिंविंनी आधी 'एरंडाचे गुऱ्हाळ', 'वायफळाचा मळा' असे स्फुट लेख असलेला विनोद निर्माण केला होता. पुलंनी सुरुवातीला 'खोगीरभरती' आणि 'नस्ती उठाठेव' या स्वरूपात तेच केले आहे. आणि चिं.वि.जोशींनी चिमणरावाचे एक कुटुंब निर्माण केले, तसे एखाद्या मोजक्या ४-५ पात्रांचा परिवार निर्माण करून पुलंचे भागणार नव्हते. कारण त्यांचे निरीक्षणाचे क्षेत्र अफाट होते. त्यामुळे त्यांनी 'बटाट्याची चाळ' निर्माण केली. बटाट्याच्या चाळीमध्ये तऱ्हेतऱ्हेची माणसे आहेत. कोणीही असामान्य नाही. पण प्रत्येकाला काही ना काही अहंकार आहे. यापायी भांडाबंसही वाटतं. सामान्य माणसाची जेवढी सुखदु:खे असतात, जेवढ्या आशा-आकांक्षा असतात, जेवढे राग-द्वेष असतात ते सगळे त्या बटाट्याच्या चाळीतल्या माणसांच्या रूपाने शाब्दिक स्वरूपात उभे केले. त्यामध्ये स्त्रिया,

पुरुष, लहान मुले, म्हातारी माणसे असे सगळ्यांचे मिळून एक जग होते. नंतर आपल्याला माहीत आहे एकपात्री कार्यक्रम ते करू लागले. 'बहुरूपी' हा शब्द त्यांनी वापरला होता. एकच पात्र असते पण ते बहुरूपे दाखवत असते. तो बहुरूपी हा शब्द जास्त बरोबर आहे. अशाच प्रकारचे मराठीत जे पुस्तक निर्माण झाले त्याला चिं.वि.जोशींकडून या किंवा त्या प्रकारे प्रेरणा मिळाली. अर्थात चिं.वि.जोशींनी जास्त करून त्यांच्या लिखाणात मध्यमवर्गीय, सदाशिवपेठी पुणे उभे केले. त्यात त्यांनीही कधी कमीपणा किंवा संकोच मानला नाही. त्याप्रमाणे पुलंनी त्या काळातले म्हणजे ५० वर्षांपूर्वीचे गिरगावच उभे केले. मध्यमवर्गीय जग उभे करणे हे मराठी विनोदकारांनी अटळपणाने केलेले काम आहे. कुठलाही विनोदी लेखक पाहा. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांपासून ते आजपर्यंतचा. जे मध्यमवर्गापासून थोडे दूरचे असे लेखक आहेत, आणि ज्यांना विनोदी लेखन करावेसे वाटले (उदाहरण द्यायचे झाले तर राम नगरकरांचे देता येईल.) त्यांनी केव्हा विनोदी लेखन केले ? तर विनोदी लेखन करायचे म्हणून नाही, तर आत्मकथन म्हणून त्यांनी केले. ते प्रामाणिकपणे करायचे हे त्यांच्या डोळ्यांसमोर होते. राम नगरकर अगदी नवशिके असतानाच्या काळामध्ये पुलंच्या मार्गदर्शनाखाली 'पुढारी पाहिजे' मध्ये काम करणारा एक किरकोळ नट होता. किंबहुना राम नगरकर, निळू फुले आणि दादा कोंडके हे नंतर गाजलेले तीनही जण त्यावेळी 'पुढारी पाहिजे' मध्ये किरकोळ भूमिका करणारे नट होते. कुणी कोंड्या, कुणी महाद्या असे. पण नंतर ते पु.ल.देशपांडे आणि वसंत बापटांसारख्या चांगल्या लेखकांच्या सहवासात आले आणि आपोआपच त्यांना मार्गदर्शन मिळाले. नंतर त्या तिघांनी आपापली क्षेत्रे निर्माण केली. प्रत्येकाचा बाज वेगळा होता. राम नगरकरने 'रामनगरी' उभी केली. त्याचे प्रयोग महाराष्ट्रात सगळीकडे केले. त्यांच्यापुढे पुलंचा आदर्श होताच. पण त्यांनी जे मोकळेपणाने लिहिले ते असे मोकळेपणाने लिहावे, विनोद करण्यासाठी म्हणून नव्हे हे त्यांच्या मनात पुलंमुळेच ठसले.

विनोदी लेखक मध्यमवर्गीय चौकटीच्या पलीकडे कधी गेले नाहीत. त्याला बरीच कारणे आहेत. विनोद हा मध्यमवर्गीयच का असतो ? थोडक्यात सांगता येईल की, जो अतिश्रीमंत, अतिधनाढ्य, अतिउच्चवर्गीय असतो त्याच्या मनोरंजनाच्या कल्पना वेगळ्या असतात. त्या पैशाच्या आहारी गेलेल्या आणि वासनामय झालेल्या असतात. पैसा टाकला की वाटेल ते मिळते अशी त्यांची वृत्ती झालेली असते आणि त्यामुळे त्यांना कपडे असले काय आणि नसले काय ? या नग्नतेचे त्यांना काही वाटत नाही. याउलट अतिगरीब, अतिनिर्धन, आदिवासी या स्तरात जो आहे त्याला दोन वेळच्या अन्नाची भ्रांत असते. त्याला अंगाला पुरेसा कपडा कधी माहीत नसतो. त्यामुळे तिथे नग्नता कारुण्य घेऊन येते आणि उच्चवर्गीयामधील नग्नता वासना घेऊन येते आणि मध्यमवर्गीयाला जे काही आहे ते सांभाळायचे, परंपरांचे पालन करायचे पण शक्य तितके आपल्या प्रतिष्ठेला जपायचे. अशा प्रकारच्या कोंडीमध्ये हा मध्यमवर्ग सापडलेला असतो. आणि म्हणून या मध्यमवर्गाकडून, विशिष्ट प्रकारची टीका या विनोदातून व्यक्त होत असते. मराठीतल्या बहुतेक सगळ्या लेखकांनी विनोदाच्या आश्रयाने समाजावर भरपूर टीका केलेली आहे. हेही अटळ असते.

आपल्यावरच ती टीका असते. साहित्याचा, कलेचा आस्वाद घेणारा हाच वर्ग असतो आणि याच वर्गाला डोळ्यापुढे ठेवून हे करावे लागते. वरच्या वर्गाला वाचनाची गरज नसते. खालच्या वर्गाला वाचन म्हणजे काय हे माहीत नसते. त्यामुळे समाजामध्ये तीन स्तर असले तरी विनोद हा फक्त मध्यमवर्गाच्या हातूनच घडतो, त्याच्या वावतीतच घडतो आणि म्हणूनच पुलंनी हा मध्यमवर्गाचा विनोद केला तो अत्यंत अटळ आणि स्वाभाविक आहे. काही लेखक, समीक्षक यांनी, हं, हे तर काय मध्यमवर्गाचे प्रतिनिधी आहेत. वूर्झ्वा आहेत अशी टीका केली. पण त्यांनी असे काही दाखवून दिले नाही की, मराठीतील कोणता विनोदकार हा वेगळ्या पठडीतला आहे. तसे करणे शक्य नाही म्हणून पु.ल.देशपांडे हे मध्यमवर्गाचे प्रतिनिधी आहेत या आक्षेपात काहीही तथ्य नाही. पण जे मध्यमवर्गीयत्व पुलंनी जपलेले आहे ते मात्र फार प्रामाणिकपणे जपलेले आहे. खरे सांगायचे झाले तर, नंतर त्यांनी वेगवेगळ्या प्रकारांनी आपला उदरनिर्वाह करूनसुद्धा पुष्कळ धन मिळेल अशा प्रकारची साधने संपादन केली. नाना प्रकारच्या आधुनिक सुविधांचा उपयोग त्यांनी केला आणि आपल्याला माहीत आहे की, महाराष्ट्रातीलच नाही तर भारतातील अत्यंत श्रीमंत अशा लेखकांपैकी ते आहेत. पण या श्रीमंतीचा, त्यांनी वंगले निर्माण करणे, दहा गाड्या उडवणे अशा प्रकारचा तोरा कधी मिरवला नाही. अनेकवेळा ते सगळीकडे चालत फिरलेले आहेत. मध्यमवर्गीयांचेच खाणे त्यांनी खाल्ले आणि कुठल्याही प्रकारची मिजास, डामडौल त्यांना माहीत नाही. घरी नोकरांची रेलचेल आहे असे कधी त्यांनी केले नाही. तर जो पैसा आपल्याला मिळाला तो दैवयोगाने मिळाला आहे, तो समाजाचा पैसा आहे आणि आपण त्याचे फक्त विश्वस्त आहोत असे मानले. त्यामुळे पु.ल. देशपांडे फौंडेशन आहे, एक विश्वस्त निधी आहे, प्रतिठान आहे आणि त्यातून त्यांनी समाजाला भरभरून परत दिले. कुठलाही गाजावाजा केला नाही. आपल्याला इकडून तिकडून माहिती मिळालेली असल्याने, कुठल्या संस्थेला अमूक एक रक्कम मिळाल्याचे कळते. पण पुलंनी कधीही त्याचा गाजावाजा केला नाही. हा मराठी साहित्यातला अपवादात्मक लेखक आहे. आर्थिक सुवत्ता प्राप्त झालेले असे मराठीतले आणखी काही लेखक आहेत. पण मला नाही वाटत त्यांच्यापैकी कोणी अगदी पूर्णपणे या पद्धतीने, आपल्या जीवनामध्ये काही ध्येयवाद जपलेला आहे आणि तो कृतीत आणला आहे.

पुल हे मध्यमवर्गीयांचे प्रतिनिधी आहेत. पण त्यांचे लक्ष तळागाळातल्या लोकांकडे आहे हे पुनः विशेष आहे. नाहीतर आपलीच गल्ली, आपलाच प्रांत, आपले एकंदरीत कुटुंब आपलेच गणगोत, आपलीच जात किंवा परिवार यांनाच जपत राहणारे असे पुष्कळ लेखक असतात. पण पुलंनी जे जे अशा उपेक्षित समाजातून पुढे आलेले आहेत, निदान त्यांची पहिली पिढी धडपड करत आहे त्यांना आपण हात दिला पाहिजे अशी सामाजिक जाणीव सतत ठेवली आणि म्हणून कुठला कोण आनंद यादव, रत्नागिरीच्या कॉलेजमध्ये असताना (योगायोगाने य. द. भावे हे प्रिन्सिपाल होते.) या मुलाचे काव्य त्यांनी नोटीस बोर्डावर लावलेले वाचले आणि त्याची वही मागवून त्याच्या सगळ्या कविता वाचल्या. त्या आनंदाला त्यांनी तेव्हापासून, त्याच्या गुणवत्तेला

जोपासले, उत्तेजन दिले. आज त्यामुळे आनंद यादव यांचा उल्लेख 'झोंबी'कार, 'गोतावळा'कार असा जो होऊ शकतो त्याचे बीज पुलंनी लावले. एक नवीन अस्सल नाणे इथे आहे हे त्यांनी ओळखले. तीच गोष्ट त्यांनी इतर लेखकांबाबतीतही केली. राम नगरकरांच्या पुस्तकावर त्यांनी आपण होऊन विस्तृत असे परीक्षण लिहिले. यशवंत मनोहरच्या 'यावर्षी आमच्या गावी पाऊस झालाच नाही' या एका कवितेने पुल हादरून गेले. त्यांनी त्याचे स्वागत केले. दया पवारांच्या 'बलुतं' ला प्रस्तावना लिहिली आणि नंतर आपल्याला असे दिसेल की, कितीतरी तळागाळातून आलेल्या, धडपडणाऱ्या लेखकांना पुलंनी मदतीचा हात दिला, उत्तेजन दिले. हे फार लेखकांना जमत नाही. पुष्कळ मोठे लेखक असे उत्तेजनपर लिहितात पण त्यामध्ये सुद्धा कुणावर तरी कृपा करण्याचा, एक प्रकारचे औदार्य दाखवण्याचा त्यांचा हेतू असतो. हे माझे औदार्य नव्हे तर हे माझे कर्तव्य आहे ही भावना पुलंसारख्या अपवादात्मक लेखकाच्याच ठिकाणी असते म्हणून तो लेखक सर्व प्रकारच्या लोकांना जवळचा वाटतो. मग ती माणसे अमेरिकेत जाऊन, उत्तम स्थितीत असणारी आणि केवळ नाटके आणि ध्वनिफितीच्या आधारे मराठीशी काही संबंध उरलेली असोत किंवा मुंबई, पुणे या मोठ्या शहरातली किंवा नागपूर, औरंगाबाद सारख्या महत्त्वाच्या शहरांमधली किंवा लहान लहान गांवांमधली आपल्या ग्रंथालयामध्ये पुलंचे असेल ते साहित्य वाचत सुटणारी माणसे पुलंना जवळची वाटतात. म्हणून आणीबाणीत पुलंवर राज्यकर्त्यांचा रोष होतो. आणीबाणीत पुलंची संभावना, शंकरराव चव्हाणांनी 'विदूषक' अशी केली पण पुलंनी ती परतवून लावली. ते म्हणाले, 'हो मी विदूषकच आहे पण नाइलाज म्हणूनच राजकीय संदर्भात, राजकारणाच्या व्यासपीठावर काही बोलायला उभा राहिलो. आता माझे काम झाले. तुमचे आणीबाणी लादणारे हुकूमशाही नेतृत्व पराभूत झाले. आता परत मी माझे विदूषकी काम करायला मोकळा झालो.' हे 'इदं न मम' असे अलिप्तपण फारच थोड्या लोकांमध्ये असते आणि म्हणून पुलंना या बाबतीत आपल्याला मान द्यावाच लागेल.

पुलंनी विनोदाच्याद्वारा टीका केली की, नाही ? हो केली. नसती उठाठेव, खोगीर भरती यातून त्यांनी टीका केली. त्यांनी कशावर टीका केली ? तर दाखवेगिरी, खोटेपणा, कृत्रिमपणा, जे आपल्याकडे नाही ते उसनेपण दाखवायचे. हे जिथे जिथे त्यांना दिसले त्यावर त्यांनी टीका केली. मग ते प्राध्यापकांचेही जग असेल. तिथे त्यांनी कुणालाही बाकी ठेवले नाही. मंगला गोडबोलेंनी 'काय हा दगदग नावाचा रस ? त्यामध्ये काय आहे ?' असे उद्गार काढले ते बरोबर नाही. त्या काळात जाऊन बघा म्हणजे कळते काय ते. १९४९ मध्ये पुण्याला जेव्हा साहित्य संमेलन भरले आणि आचार्य जावडेकर त्याचे अध्यक्ष होते, तेव्हा कधी नव्हे ते व्यासपीठावर साने गुरुजी आलेले होते. शंकरराव जावडेकरांच्या प्रेमापोटी सानेगुरुजी व्यासपीठावर आले होते. त्यावेळी आचार्य जावडेकरांनी आपल्या भाषणांत 'क्रांती' नावाच्या रसाचे वर्णन केले. मग इतरही अनेकांनी वेगवेगळ्या प्रकारांनी या रसचर्चेत भर घातली. जी अष्ट किंवा नवरसांची पारंपारिक कल्पना आहे ती आजच्या काळात पुरेशी नाही म्हणून आणखी काही रसांची भर घातली. आता कोणत्याही

पद्धतीने रसचर्चा करायची तर त्याचे मोजमाप, गणित, शास्त्र ठरलेले असते की विभाव कोणता, अनुभाव कोणता, व्यभिचारी भाव कोणता, मग ती चर्वणा कशी होते, त्याची रसनिष्पत्ती कशी होते हे सगळे व्यवस्थितपणे दाखवून द्यावे लागते. ते त्या त्या लोकांनी करायचा प्रयत्न केला. त्यामुळे 'मानवता' नावाचा रस अनिलांनी सांगितला. (त्याला 'मानवता' नावाची अनिलांची कविता आहे हेही कारण असू शकेल.) पुलंना वाटले असे रोजच्या रोज नवीन रस यायला लागले तर मग गोंधळ होईल. त्या वेळेला काव्यामध्ये एक नवीन प्रवृत्ती आली होती. दुसरे महायुद्ध होऊन गेलेले आहे, सगळ्यांचे जीवन किडामुंगीसारखे झालेले आहे. म्हणून 'तू एक मुंगी, मी एक मुंगी' अशा प्रकारच्या कविता साक्षात मर्ढेकर लिहीत असत. जंतूवादी कवी म्हणून आचार्य अत्रे त्यांची संभावना करत आहेत. हे काहीतरी चमत्कारिक काव्य आहे, मुख्यार्थाला बाधा येत आहे अशी टीका प्रा.रा.श्री. जोग करत आहेत आणि वा.ल.कुलकर्णी किंवा मं.वि.राजाध्यक्ष यांच्यासारखे नवीन दमाचे लेखक त्याचे समर्थन करत आहेत असा तो काळ होता. आपल्या लेखनामध्ये याचा समाचार घ्यायला पाहिजे असे पुलंना वाटले म्हणून त्यांनी 'आणखी एक रस' आणला.

त्या रसाचे वर्णन करताना सुरुवातीला त्यांनी वेगवेगळ्या परिचयाच्या रसांचेच वर्णन केले आहे. उदा. पानवाला, तो जो तांबूलाचा रस आहे, तो त्यांच्या रोजच्या सवयीचा आहे. म्हणून त्यांनी असे म्हटले आहे की, तो पानवाला त्याच्या दुकानात बसलेला असतो, तो खरं म्हणजे पुजारी असतो. अगदी चकचकीत पात्रे त्याच्या पुढे असतात. आणि तो किती नाजूकपणे पानाला चुना लावतो, वेगवेगळे पदार्थ घालतो. तेव्हा एक कलावंत कसा असतो याचे ते एक उदाहरण आहे आणि मग पानाची गंमत नुसते साधे पान किंवा मसाल्याचे पान खाण्यामध्ये नाही तर चांगले चुना लावलेले तंबाखू मळलेले असे पान की जे चावून सतत थुंकावे लागते त्यात खरी गंमत आहे. म्हणून तो रस त्यांनी सांगितला. नंतर त्यांनी आणखी एक रस सांगितला तो म्हणजे 'उसाचा रस'. आले, बर्फ, लिंबू टाकून रस मिळेल असे खाली लिहिलेले असते. तो रस नुसता गटागटा पिऊन टाकायचा असतो. अशी वेगळ्या वेगळ्या रसांची वर्णने करून झाल्यावर ते आले आहेत 'दगदग' रसाकडे आणि मग त्या 'दगदग' रसाला आधारादाखल कविता घ्यायची आहे ती कवी यशवंतांची घेतली, ती कोणती ? 'कुठवर ही थांबणार बोगद्यात गाडी ?' म्हणजे गाडी बोगद्यात शिरली आहे आणि मग बंद पडली आहे किंवा तिला सिग्नल मिळाला नसेल. असा बराच वेळ गेला म्हणून कवीला वाटले 'कुठवर ही थांबणार बोगद्यात गाडी ?' तेव्हा अंग घामाने डबडबले आहे. गाडी केव्हा सुरू होणार हे माहीत नाही. पोटात तर भुकेचे कावळे कोकलत आहेत. सकाळपासून दगदग झाली आहे अशावेळी कुठला रस निर्माण होणार ? तर 'दगदग' रसच निर्माण होणार. मग तो सगळ्या विभाव, अनुभाव, व्यभिचारी भाव पद्धतीने बसवून दाखवला आणि मग शेवटी अशा नवीन नवीन रसांचा शोध लावणारा ज्ञानेश्वरीचा अभ्यासक असतो. तो एखाद्या जुन्या ग्रंथाचा आधार शोधतो. तशा एका जुन्या पठडीतल्या प्राध्यापकाचा आधार त्यांनी शोधलेला आहे. त्यात त्यांनी म्हटले आहे, 'शतकू बीसू नाही चांगू, त्यांतू यंत्रची जिंकी जगू. शृंगार-वीराचा लोका उबगू. दगदगू रसचि श्रेष्ठ

पै.' आता हे त्यांनी कुठल्या ज्ञानेश्वरीसारख्या कोणत्यातरी ग्रंथात शोधले असे भासवले आहे. पण पुलंची या बाबतीत एक खासियत आहे. ती म्हणजे ते तळटीपा फार मार्मिक देतात त्या 'चांगु'च्याखाली एक तळटीप आहे. 'प्रो.चांगू ते हे ते नव्हे वरे.' कारण की त्यावेळी कोल्हापूरला प्रा.द.सी.पंगू नावाचे प्राध्यापक होते. ते असे जुन्या कवींबद्दल लिहीत असत. सामराज नावाचा फारसा महत्त्वाचा नसलेला असा कवी. त्याचे काव्य 'रुक्मिणीहरण' हे प्रो.पंगूंना मिळाले. तेव्हा तावडतोब त्यांनी त्याच्याबद्दल लिहिताना, 'आमचा महाकवी' असे लिहून टाकले. तेव्हा तळटीपा देऊन आपली विद्वत्ता दाखवून देणे हा काही अभ्यासकांचा मार्ग असतो. पुलंनी काय केले ? वेगवेगळ्या हिंदी सिनेमांच्या पद्यावल्यांचा संदर्भासाठी उपयोग केला. आणि त्यामध्ये 'दुनियामें गरिबोंको आराम नही मिलता' ही जोहरावाई अंवालावाळीची गज़ल आहे तिची तळटीप दिली आहे 'गरीबीवद्दल हिंदी कवीही असेच म्हणतो.' तेव्हा हा जो दगदग रस होता तो खोट्या विद्वत्तेवरती, दिखाऊपणा करणाऱ्या विद्वत्तेवरती उतारा होता. 'अंगुस्तान विद्यापीठ' हेही तसेच. पुणे विद्यापीठ स्थापन होण्याच्या सुमाराला विद्यापीठ कसे असावे, कोणकोणते विभाग असावेत वगैरे वगैरे, याची सतत उलटसुलट चर्चा होत असे. मी फक्त त्याची आठवण करून देतो की, 'अंगुस्तान विद्यापीठ' हा सुद्धा सुरुवातीच्या काळातला अप्रतिम लेख आहे.

आणखीही काही लेख आहेत. एक आहे 'संगीत चिवडामणी'. पुलंना त्या काळी जगण्यासाठी संगीताच्या काही शिकवण्या कराव्या लागल्या होत्या. सकाळी कुठल्या तरी घरी जायचे, दुपारी कुठल्या तरी घरी जायचे असे. जेव्हा जेव्हा मध्ये वेळ असेल तेव्हा जाऊन संगीताच्या शिकवण्या घ्यायच्या. असा, संगीत शिकवायला कोणी तरुण येतोय याचा मुलीच्या वापाने धसका घेतलेला असायचा. आपली मुलगी या तरुणाचा हात धरून पळून जाते की काय ? असे त्याला वाटत असे. यामुळे घरातील कोणीतरी प्रौढ किंवा म्हातारी व्यक्ती तिथे पहाऱ्यासाठी हजर असे. तेव्हा त्या टोकाला मुलगी वसत असे आणि या टोकाला शिकवणाऱ्याने बसायचे अशा त्या संगीत शिकवण्या चालायच्या आणि त्यात आपण याला पैसे देतो आहे ते बुडता कामा नये म्हणून 'आज वेवीला दुपारच्या गाडीने गावाला जायचे आहे तेव्हा तुम्ही सकाळी ६ वाजता येऊन शिकवा.' अशा प्रकारे त्यांच्या वेळाही सांभाळून शिकवायचे. एवढेच नव्हे तर आज हिला वेळ नाही तर उद्या तिच्या आईलाच शिकवा वदली विद्यार्थी म्हणून. असले अनेक अनुभव त्या माणसाला येतात म्हणून तो काय करतो ? तो संगीत सोडून देतो आणि पी.वाय.सी. जिमखान्यावर चिवडा विकायला लागतो. मुळामध्ये गळा तयार असतो त्यामुळे तो 'चिवडा घ्या चिवडा' हे सुद्धा तो वेगवेगळ्या रागांमध्ये आणि तालामध्ये उच्चारतो आणि तिथे त्याला हा लेखक भेटतो तेव्हा लेखकाला तो सांगतो 'आज समाजाला संगीत चूडामणीची गरज नाही तर संगीत चिवडामणीची गरज आहे.' एका अर्थाने पाहिले तर हे मोठे विदारक असे भाष्य आहे. कारण या संगीत शिक्षकाचे पैसे कसे बुडवायचे, तर जुलै महिना संपला की ऑगस्ट महिन्यात पैशाचे नावच काढायचे नाही आणि ऑगस्टच्या शेवटच्या तारखेला, जुलै महिन्याचा पगार हातावर ठेवायचा. मग तो लगेच काही सप्टेंबरमध्ये पगार मागत



अनुक्रमणिका

नाही. कारण ४ दिवसांपूर्वीच पगार मिळालेला असतो. त्यामुळे १ महिना फुकटच जातो. अशी तन्हेतऱ्हेची माणसे, पुलंना त्यांच्या गरिबीच्या काळात भेटली. त्याचा त्यांनी, 'नसती उठाठेव' आणि 'खोगीर भरती'मध्ये बरोबर वापर केला आहे. त्यामुळे एका अर्थी पुलंनी वेगळे आत्मचरित्र काही लिहिले नाही. पण स्वतःबद्दल अधूनमधून सरळ सरळ लिहिले आहे. भाईसाहेबांची बखर त्यांनी पंचाहत्तरीच्यावेळी लिहिली. पण ही त्यांची स्वतःची स्फुट अशी आत्मचरित्रेच आहेत. त्यातून तो तो काळ आपल्या डोळ्यांसमोर उभा राहतो.

पुलपरिस्थितीशी झगडत, परिस्थितीवर मात करत पुढे येऊन स्थिर झालेले आहेत. पण म्हणून त्यांच्या लेखनात कुठे कडवटपणा आला का ? तर मुळीच आला नाही. १९५७ साली, पुणे आकाशवाणीने, आकाशवाणीवर एक व्याख्यानमाला आयोजित केली होती. वेगवेगळ्या लेखकांची, नामवंतांची मी कसा लिहितो ? का लिहितो ? याबद्दल ही व्याख्यानमाला घडवली होती. त्यात मामा वरेरकरांनी आपल्या नाटकाबद्दल सांगितले होते किंवा मंगेश पाडगावकरांनी आपल्या कवितांबद्दल सांगितले होते. तसे पुलंनी आपल्या विनोदी लेखनाबद्दल त्यावेळी पहिल्यांदा सांगितले आणि त्यात ते असे म्हणतात की, हे खरं आहे, मी विनोदाचा शस्त्राप्रमाणे उपयोग केला आहे. नव्हे, मी हजामत केली. पण कशी ? तर ज्याची हजामत होते, त्याला हजामत झाल्यावर स्वच्छ वाटले पाहिजे. आणि त्याला रक्त येता कामा नये. जखम होता कामा नये. हे मोठे कौशल्याचे काम आहे, की ज्याच्यावर टीका होते त्यालाही आनंद आणि ती टीका कुठल्याही प्रकारे ओरखडे काढणारी अशी नाही. हे एक पथ्य पुलंनी पहिल्यापासून पाळले आहे. त्यावर नंतर एकदा आकाशवाणीवरतीच, विनोद म्हणजे काय ? तो करताना आपल्याला हसू कसे येते, याचे वर्णन करताना मार्मिकपणे म्हटले आहे की, 'अरे रडायला काय झाले ?' याचे उत्तर देणे सोपे असते. काही तरी दुखत असते, कोणी तरी बोलले असते, आजार असेल, पैसा बुडला असेल अशी रडण्याची अनेक कारणे असतात पण, 'अरे, हसायला काय झाले ?' याचे एकदम उत्तरच देता येत नाही. हसणे हे त्या क्षणी घडलेल्या गोष्टीचे जसे असते तसेच पूर्वी होऊन गेलेल्या गोष्टीची आठवण झाली तरी त्या आठवणीनेही हसू येते. आणि ते दुसऱ्याला सांगता येत नाही. हसणे हे सर्वांना प्रिय असते पण त्याचे स्पष्टीकरण देता येत नाही.

हे पूर्वी अगदी श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांनीही सांगितले होते. ते म्हणत असत, 'तुम्हाला हसवण्यासाठी मला माझ्या डोक्याचे भजे करून घ्यावे लागते. म्हणजे जो विनोदकार असतो त्याला विनोद निर्माण करण्यासाठी बरेच क्लेशही सहन करावे लागतात. पण शेवटी तुमचे हसणे महत्त्वाचे असते. जर ते हसणे हुकमी असेल, प्रासंगिक असूनही टिकणारे असेल तर ते खरे हास्य, तो खरा विनोद' असे वर्णन त्यावेळी श्रीपाद कृष्णांनी केले आहे. अशा प्रकारचे वर्णन गडकरी करू शकले नाहीत. ते विनोद उत्तम करीत पण ते कुठल्याही प्रकारचे भाष्य करू शकत नव्हते. ती क्षमता त्यांच्याजवळ नसेल किंवा ते अतिशय संकोची, भिडस्त स्वभावाचे असतील पण जेव्हा ते गुरु-शिष्य म्हणजे श्री. कृ. व गडकरी एकमेकांना भेटत असत तेव्हा ज्या प्रकारचा विनोद ते



अनुक्रमणिका

एकमेकात करत असत, तो विनोद साहित्यामध्ये अजरामर टिकून राहिला. एकदा असे घडले की, अमूक दिवशी येणार असे गडकऱ्यांनी, श्री.कृं.ना सांगितले आणि त्या दिवशी काही गडकरी आले नाहीत. 'मी आपला सारखी तुमची वाट वघत दाराकडे लक्ष टेवून होतो आणि मला तिथे गाढवे दिसत होती पण तुम्ही काही दिसला नाहीत.' असे श्री. कृ. म्हणाले. त्यावर गडकरी म्हणाले, 'तात्या, तुम्ही म्हणता ते खरे आहे. आता यापुढे जेव्हा जेव्हा मला गाढव दिसेल, तेव्हा तेव्हा मला तुमचीच आठवण येईल.' 'तुमची आठवण येईल तेव्हा मला गाढव दिसेल' असे श्री.कृ. म्हणाले. त्यावर गडकऱ्यांनी तोडीस तोड उत्तर दिले व टोल्याला प्रतिटोला देऊन विनोद केला. पुल, अत्रे यांच्याजवळही असे अपार सामर्थ्य होते म्हणून त्यांच्या विनोदावद्दल अनेक आख्यायिका निर्माण झाल्या.

गेली ५० वर्षे पुल लिहीत होते. त्यांच्या लिखाणात वदलत्या काळाच्या इतक्या खुणा आहेत की, ह्या अंगाने जरी आपण अभ्यास केला तरी वदलत्या काळाचे ते साक्षीदार आहेत याची आपल्याला कल्पना येईल. स्वातंत्र्यपूर्व काळाच्या काही घटना १९४७, ४८ पूर्वीच्या लेखनामध्ये आहेत. पण ते तेव्हा नवशिके लेखक होते. त्यांना पहिल्यांदा चांगल्या प्रकारे मान्यता मिळाली ते 'पुढारी पाहिजे' या तमाशामुळे. १९५१ सरता सरता हा तमाशा लिहिला होता. कारण त्यावेळी पहिली सार्वत्रिक निवडणूक व्हायची होती. त्या निवडणुकीला एक पक्ष म्हणून समाजवादी पक्ष होता. जयप्रकाश नारायण, अच्युतराव पटवर्धन किंवा अशोक मेहता ही मूळची काँग्रेसमधील पण काँग्रेसमधून वाहेर पडून त्यांनी 'समाजवादी पक्ष' स्थापन केला होता. त्यात एस.एम.जोशी होते, नानासाहेव गोरे होते, लोहिया होते. पण त्यावेळी नेहरू आणि त्यांची काँग्रेस यांचे जवरदस्त वर्चस्व होते आणि नुकतेच देशाला स्वातंत्र्य मिळाले होते, ते गांधी आणि नेहरूंमुळे मिळाले अशी समाजामध्ये त्यांची प्रतिमा होती. म्हणून समाजवादी पक्ष पडला. तो कायमचा पडतच गेला. आता समाजवादी पक्ष या नावाने इतके पक्ष निर्माण झाले की, कोणी त्याला जनता पक्ष म्हणतात, कोणी 'ही' जनता, 'ती' जनता म्हणते. वाईट म्हणजे 'जनता' हे नाव घेऊन लालू यादवसुद्धा पक्ष काढतात ! अशा अवस्थेपर्यंत हा समाजवादी पक्ष का गेला हा वेगळा विपय आहे पण या समाजवाद्यांनी काँग्रेसमध्ये राहूनच काँग्रेस ताब्यात घेतली असती तर, देशाचे वेगळेच चित्र दिसले असते. पण या जर तरच्या गोष्टी झाल्या. त्या सांगून काही उपयोग नाही. तेव्हा पहिल्या निवडणुकीची सारी चित्रे या 'पुढारी पाहिजे' मध्ये आहेत.

नंतर आले 'अंमलदार'. आपल्याला माहीत आहे, तेव्हा संस्थाने विलीन झालेली होती. त्यामध्ये दक्षिण महाराष्ट्रातले एक किरकोळ संस्थान होते. लोकांनी दोन्ही राजवटी पाहिल्या होत्या. स्वातंत्र्यपूर्व काळातील संस्थांनी राजवट आणि आता स्वातंत्र्य मिळाल्यावरची राजवट. कित्येक संस्थाने इतकी किरकोळ होती की, ती एकदोन तालुक्यांपुरतीच मर्यादित होती. पण त्यांचा कायदा वेगळा, हुकूमत वेगळी. कित्येक संस्थानांमध्ये, विशेपतः हैद्रावादमध्ये नाणीही वेगळी होती. असले सगळे सोपस्कार त्या संस्थानांमध्ये चालत आणि त्याचा फायदा काही स्वातंत्र्य सैनिकांना झाला. व्रिटिश राजवटीच्या

भागात काहीही कृत्य करावचे आणि संस्थानात जाऊन लपायचे. साहजिकच तिथे वेगळे कायदे असल्याने त्यांना एकदम पकडता यायचे नाही आणि तोपर्यंत गुंगारा देता येत असे. अशा संस्थानामध्ये कोणत्या माणसाकडे काय काम सोपवले जाईल याला काहीही धरबंद नव्हता. ग्वाल्हेर संस्थानांमध्ये भा.रा.तांबे हे त्या वेळचे मराठीतील श्रेष्ठ कवी, पण ते तेथे पोलीस खात्याचे प्रमुख होते ! असले प्रकार संस्थानात चालत असत. कारण संस्थानिकांचा लहरीपणा. त्यांना कोण विचारणार? आणि सगळा पुन्हा खोटा वडेजाव. कोणाकडेही पैसा नव्हता. पुरेसे पोटाला नव्हते. त्यामुळे त्याचे वर्णन त्याकाळी चिं.वि.जोशींनी 'चिमणराव स्टेट गेस्ट' मध्ये केले होते. आणि चौथे चिमणराव मध्येही त्यांनी संस्थाने विलीन झाल्यावर केवळ 'काप गेले आणि भोके राहिली' अशा अवस्थेतल्या एका संस्थानिकाकडे ते गेले आणि त्याचे वर्णन त्यांनी केले. तो संस्थानी, लहरी कारभार पुलंनी 'अंमलदार' मध्ये चित्रित केला. मुळात 'अंमलदार' मध्ये गोगोलचा इन्स्पेक्टर जनरल मराठीमध्ये आणायचा हे मोठे अवघड काम होते. सरदार वल्लभभाई पटेलांनी, जे संस्थानांचे विलिनीकरण सहजपणाने केले. त्याचा जो सामाजिक, राजकीय, आर्थिक परिणाम झाला त्याचा नेमका वेध 'अंमलदार' मध्ये पुलंनी घेतला.

'तुझे आहे तुजपाशी' मध्येसुद्धा ही प्रासंगिकता आहे. सर्वोदय नावाचा जो एक पंथ निर्माण झाला त्यात मूळचे सर्व काँग्रेसमधले, चळवळीमध्ये भाग घेतलेले गांधींचे अनुयायी होते. हे आश्रमात राहणारे किंवा नंतर सेवाग्राम मध्ये राहणारे किंवा विनोबांच्या परंधाम मध्ये राहणारे होते. त्या सगळ्या लोकांमध्ये विद्वत्ता होती पण कसली ? तर गीतेचा अभ्यास केल्याची. पण खरे म्हणजे ते केवळ पाठांतर आहे. आचार्य भागवतांना किंवा तत्सम लोकांना बंगाली भाषा येत होती. त्यांच्याकडे काही गुणवत्ता होती. पण आपण स्वातंत्र्य मिळाल्यानंतर काय करायचे याबद्दल काही स्पष्ट दिशा नव्हती. एक प्रकारचे पोरकेपण होते. त्यामुळे खोटेपणा आला. हा खोटेपणा पुलंना कुठे जाणवला? तर विनोबांनी भूदान यज्ञ १९५२ मध्ये सुरू केला आणि एक एक राज्य फिरत फिरत, दक्षिण दिग्विजय, उत्तर दिग्विजय असे एक एक पराक्रम करत तामीळनाडूमधून, कर्नाटकमधून, निपाणीला महाराष्ट्राच्या सीमेवर ते आले. त्यावेळी संयुक्त महाराष्ट्राची चळवळ दडपण्यासाठी काय अत्याचार घडले, हे अनेकांनी पाहिले होते. सगळे लेखक त्यांना इचलकरंजीला भेटायला गेले होते. तिथे 'लेखकांशी संवाद' असा एक कार्यक्रम ठेवला होता. विनोबा हे स्वत: प्रकांड पंडित, अनेक भाषा पारंगत आणि बोलेल ते करेल असे वागणारा निधड्या छातीचा माणूस. खराखुरा विधायक वद्धीचा, महात्मा गांधींचा अनुयायी. पण त्यांच्या आजूबाजूला जी माणसे होती, ती केवळ विनोबांच्या नावावर आपल्याला काय मिळेल हे पाहात होती. 'लोकसत्ता' हे त्यावेळचे अधिक खपाचे दैनिक; त्यात त्या वेळच्या वातम्या अशा आल्या होत्या की या सगळ्या आचार्यांनी काय काय केले ? तर सावणाच्या वड्या पळवल्या. किंवा खजूर, काजू, वेदाणे वगैरे पदार्थ मुठीमुठीने पळवले. सर्वांना खा खा सुटली होती. कारण मोह तर आवरत नव्हता. आणि दाखवायचे तर होते आपण किती त्यागी, विरक्त आहोत ! या सर्व प्रकाराचे, विनोबा आणि त्यांच्या अनुयायांचे चित्र पु.लं.नी

पाहिले. योगायोगाने २-४ वर्षे आधीच त्यांचा, रामूभय्या दात्यांशी परिचय झाला होता. एका भेटीतच तो माणूस किती सच्चा, अस्सल आहे याचा शोध लागला होता. एकीकडे रामूभय्या दाते आणि एकीकडे विनोबांच्या परिवारातील उथळ माणसे यांचे चित्रण एखाद्या नाटकात करावेसे पुलंना वाटले आणि म्हणून १९५७ साली त्यांनी 'तुझे आहे तुजपाशी' मध्ये हे आणले. आता त्या काळात भूदान, अन्नदान, वस्त्रदान, जीवनदान, ग्रामदान या सगळ्या शब्दांची चलती होती. त्यामुळे सगळ्या लोकांना हे शब्द कळत होते. त्यामुळे प्रत्येक शब्दाच्या फेकीला अतोनात प्रतिसाद मिळत असे. आता ४० वर्षे होऊन गेली. तेव्हाच्या गोष्टी आता जुन्या झाल्या. लोकांना संस्थाने विलीन झाली म्हणजे काय ते कळत नाही आणि हे भूदान वगैरे दान प्रकरण काय असते तेही माहीत नसते. त्यामुळे त्या आचार्यांची प्रतिमा त्या वेळच्या लोकांसमोर जी उभी होती ती आता उरलेली नाही. कोणावर तरी टीका केली आहे, टिंगल केलेली आहे आणि आपण हसायचे आहे एवढेच कळते. आजकाल 'अतिविशाल महिलांचा' प्रवेश आणि भांगेच्या नशेतील वासूअण्णा व जगन्नाथ माळी यांचा प्रवेश यांचा धुमाकूळ घालून सिनेनटनट्यांनी या गंभीर नाटकाचा भडक फार्स करून टाकला आहे ! अत्र्यांच्या लग्नाच्या बेडीचेही हेच चालले आहे ! त्या वेळच्या घटनेचे प्रतिबिंब उमटलेले आहे असे आपल्याला नंतरच्या त्यांच्या अगदी अलीकडच्या लेखनापर्यंत सांगता येईल. पुल अशा प्रकारे काळाशी सतत समांतर राहिलेला लेखक आहे. आणि लेखक म्हणून त्यांनी उदंड मान्यता मिळवली. एक चांगला वक्ता, सादर करणारा कलावंत वगैरे वगैरे म्हणूनही मान्यता मिळाली.

पण आश्चर्य याचे वाटते की, रूढ अशा प्रकारचे लेखन न करताही त्यांना अशी मान्यता मिळाली. त्यांनी एकही कादंबरी लिहिली नाही. कथासुद्धा अगदी मोजक्या म्हणजे ३-४ च लिहिल्या. त्यातल्या त्यात 'म्हैस' ही घटनाप्रधान, अनपेक्षित धक्के देणारी कथा लिहिली. आणि 'नारायण' ही कथेच्या वळणाची व्यक्तिरेखा, या पलीकडे पुलंनी कथा लिहिली नाही. ज्याला आपण भावकविता म्हणू अशा कविता लिहिल्या नाहीत. विनोदी संगीतिका मात्र लिहिली. अधून मधून चित्रपटासाठी गाणी लिहिली. पण कविता लिहिल्या नाहीत. म्हणजे रूढ मार्ग हाताळले नाहीत. नाटकामध्येही ते देवलपंथीय आहेत. त्यांचे स्वतंत्र नाटक म्हणजे फक्त 'तुझे आहे तुजपाशी'. बाकी सगळी नाटके आधारित, रूपांतरित, भाषांतरित. म्हणजे मुळापेक्षा काही वेगळे असले तर ते फक्त आपले वातावरण आणि मराठीपण. ते मात्र हुकुमीपणाने आणले आहे. असे असूनही त्यांना मान्यता मात्र खांडेकर, फडके, कुसुमाग्रज, गंगाधर गाडगीळ किंवा अन्य लेखकांसारखीच मिळाली. म्हणजे मान्यता मिळण्यासाठी अमुक प्रकारचे लेखन केले पाहिजे असे नाही. मूळचा अस्सल झरा असला म्हणजे तो तुकारामांप्रमाणे आव्हान देऊ शकतो. 'तुका म्हणे झरा मूळचाच आहे खरा'. तीच गोष्ट पुलंची आहे.

पुलंनी एकीकडून नवीनपणा आणि एकीकडून परंपरा यांचा मेळ घातला आहे. हे त्यांच्या स्वभावातले आणि लेखनातले वैशिष्ट्य आहे. त्यांनी जुना कीर्तनकाराचा, बहुरूप्याचा, नकलाकाराचा बाज, जो परंपरेतून आला होता तो जपला. तसेच त्या परंपरेत कथाकार होता,

वासुदेव होता, हरदास होता, भराडी होता, कीर्तनकार होता, तमासगीर तर होताच या सगळ्यांना त्यांनी हेरले आणि आधुनिक बहुरूपी, एकपात्री अशा प्रकारचे प्रयोग त्यांनी केले. याचा परिणाम काय झाला तर १९५६-५७ नंतर नव्या उमेदीचे अनेक एकपात्री कलाकार निर्माण झाले. सुहासिनी मुळगावकर, एकपात्री 'स्वयंवर' आणि एकपात्री 'सौभद्र' करत असत. मुरलीधर राजूरकर 'नमुनेदार माणसं' या नावाचा एकपात्री कार्यक्रम करीत असत. नंतर शिरीष कणेकर, विश्वास मेहेंदळे किंवा लक्ष्मण देशपांडे असे अनेकजण एकपात्री कार्यक्रम करतात. यांच्या सगळ्या कर्तृत्वाचा मुख्य गाभा म्हणजे आवाजाच्या नकला. लक्ष्मण देशपांडेंच्या 'वऱ्हाड निघालंय लंडनला' मध्ये तेच सांगतात की मी ५५ आवाज उभे करतो म्हणजे शेवटी एकप्रकारे ते कुठल्यातरी कथेच्या चौकटीत बसवलेले आहे. मुळामध्ये तो आवाजाचा नकलाकार आहे. या सगळ्यांना मराठीत प्रतिष्ठा प्राप्त झाली. एवढेच नव्हे तर अखिल भारतीय स्तरावर, एकपात्री करणारा हा प्रदेश आहे याची नव्याने नोंद झाली. म्हणजे बंगालने अनेक नवीन नवीन प्रयोग केले तसे महाराष्ट्रानेही जे प्रयोग केले ते पुलंच्या पुढाकाराने घडले आहेत. 'वाऱ्यावरची वरात' ला तर काही तोडच नाही. त्याचे सगळ्यांनी वर्णन आणि कौतुक करून झाले आहे.

पुलंनी बदलत्या काळाची तंत्रे आत्मसात केली हे त्यांचे एक वैशिष्ट्य आहे. ते योगायोगाने चित्रपट क्षेत्रात आले, पण चांगल्या प्रकारचे चित्रपट निर्माण केल्याशिवाय राहिले नाहीत. ते नभोवाणीवर, काही राजकीय, त्यावेळच्या उदार भूमिकेमधून गेले. पण तिथेही त्यांनी आपल्या कर्तृत्वाचा ठसा उमटवला. तुम्हाला माहीत नसेल म्हणून सांगतो, दिल्ली आकाशवाणीवरून दर गुरुवारी वेगवेगळ्या प्रांतांच्या लोकगीतांचा, साहित्याचा एक तासाचा कार्यक्रम असतो त्याची सुरुवात पुलंनी केली. त्यांनी मराठी गणगौळणीपासून वेगवेगळ्या बाजाचे तमाशा, लावण्या यांचा एक तासाचा कार्यक्रम सादर केला. अस्सल लावण्या म्हणणाऱ्या कोपरगावकरीण, वाईकरीण किंवा विठाबाई नारायणगावकर अशा अनेक अस्सल कलावंतींना त्यांनी दिल्लीला नेऊन मराठी लोकसंगीताचा झेंडा तर तिथे फडकवलाच पण हे एक महत्त्वाचे अंग आहे म्हणून नरेंद्र शर्मा जे पहिल्यापासून विविधभारतीचे काम पाहत होते, त्यांनी ही कल्पना उचलली आणि दर गुरुवारी, लोकसंगीताचा अखिल भारतीय स्तरावरचा कार्यक्रम सुरू केला. तेव्हा सरकारी चौकटीलाही नवीन वळण देण्याचे कर्तृत्व पुलंनी दाखवलेले आहे म्हणूनच परंपरा आणि नवता या सगळ्यांमध्ये पुलंचा हात आहे असे मला नक्कीच वाटते.

महाराष्ट्राने त्यांच्याकडून खूप काही मिळवले आहे आणि त्यांनीही दोन्ही हातांनी भरभरून, सर्व प्रकारे दिले आहे. वक्तृत्व, अभिनय, संगीत सगळ्या बाबतीत दिले आहे. काळाच्या ओघात सर्व काही टिकत नाही. काही विसरलेही जाईल. पण 'माझिया माहेरा जा' किंवा त्यांनी स्वत: चाली दिलेली अनेक गाणी नक्की टिकतील. लहान मुलांचे 'नाच रे मोरा' हे गाणे किंवा 'करू देत शृंगार' सारखे उत्तम गाणे किंवा 'इंद्रायणी काठी' सारखा उत्तम अभंग या त्यांच्या मोजक्या रचना आहेत. पण त्या कायम टिकणाऱ्या आहेत. आणि पुलंच्या संगीत दिग्दर्शनाखाली जितेंद्र अभिषेकींनी

जी दोनच गाणी म्हटली ती कायम टिकणारी गाणी आहेत. 'शब्दावाचुन कळले सारे शब्दांच्या पलिकडले' किंवा अनिलांसारख्या कवींची 'वाई या पावसानं' सारखी कविता हे जे त्यांनी मराठीला भरभरून दिले हे कायम टिकणारे आहे किंवहुना पुरुप लेखकाने स्त्रीचे मनोगत जाणून माहेर-सासर वद्दलचे तिच्या मनातील भाव जे अचूक टिपले आहेत त्याला तोड नाही. 'माझिया माहेरा जा' हे राजा वढे यांनी आणि 'घाल घाल पिंगा वाऱ्या' हे कृ.व.निकुंव यांचे काव्य. या काव्यातून त्यांनी व्यक्त केलेल्या भावना इतक्या तोलामोलाने स्त्रियांना सुद्धा व्यक्त करता आलेल्या नाहीत. तेव्हा पुलंनी आपल्याला गाणी दिली, विनोद दिले, तऱ्हेतऱ्हेची प्रवास वर्णने दिली. ही त्यांची मराठीला केवढी देणगी आहे. अपूर्वाई काय, पूर्वरंग काय, वंगचित्रे काय किंवा जावे त्याच्या देशा काय, कुठलेही प्रवास वर्णन, व्यक्तिचित्रे - मग ती काल्पनिक असोत किंवा वास्तवातली असोत. आपल्यापुढे तो काळ ते उभा करतात. - त्यांना काय म्हणायचे आहे हे आपल्या लक्षात येतं. पुलंवद्दल वाट्टेल तो आक्षेप घेता येईल पण 'यांचे आम्हाला काही समजत नाही' असे अजिवात म्हणता येणार नाही. अधिक समजले, त्याहून अधिक समजले असे दुसऱ्या वाचनात, दहाव्या वाचनात आपल्याला म्हणता येईल. तसे आपले चांगल्या पुस्तकांच्या वावतीत नेहमीच होते. आजही 'चिमणरावांचे चऱ्हाट' वाचायला घेतले की, अनेक नवीन गोष्टी जाणवतात. तेव्हा हे सामर्थ्य पुलंमध्ये आहेच.

गेल्या ५० वर्षांमध्ये महाराष्ट्रात वावरणारा हा पुरुपोत्तम आहे. याच्याप्रमाणे महाराष्ट्राला कोणी काय दिले आणि महाराष्ट्राचे नाव वाढवले याची मोठी यादी आहे. सगळ्यांवद्दल स्वतंत्रपणे बोलता येईल पण मी फक्त मला जी नावे सहज आठवली ती सांगतो. तीच नावे अंतिम असली पाहिजेत असा माझा दावा नाही. त्यांच्यासारखी दुसरी नावेही वेगवेगळ्या व्यक्तींना सांगता येतील. पण मला असे जाणवले की गेल्या ५० वर्षांत महाराष्ट्रामध्ये वेगवेगळी क्षेत्रे कोणी गाजवली? राजकारण - डॉ. वावासाहेव आंवेडकर, एस.एम.जोशी, भाई डांगे, यशवंतराव चव्हाण, वसंतदादा पाटील, नाना पाटील, नाथ पै आणि रामानंद तीर्थ ही नावे महाराष्ट्राच्या राजकारणाच्या संदर्भात गेल्या ५० वर्षांत घेतलीच पाहिजेत. यांच्या बरोवरीने आणखी काही नावे आहेत. त्यानंतर समाजकारण. त्यात गाडगेवावा, विनोवा, वावा आमटे, गोदावरी परूळेकर, हमीद दलवाई आणि पद्मश्री विखे पाटील. यांच्याच वरोवरीने गं.वा.सरदार. एवढेच नव्हे तर मला असे जाणवते की, 'सकाळ'कार नानासाहेव परुळेकर हे समाजाची सर्वांगीण उन्नती होण्यासाठी आयुष्यभर धडपडले आणि महाराष्ट्राचे पाऊल हे पुरोगामी पद्धतीकडे वळावे म्हणून कोणी प्रयत्न केले ? तर शंकरराव किर्लोस्कर यांनी. ही सगळी माणसे समाजकारणाच्या संदर्भात आपल्याला विचारात घ्यावी लागतीलच. अर्थकारण आणि उद्योगकारण यात महाराष्ट्र दुवळा आहे. तरीसुद्धा चिंतामणराव देशमुख, धनंजयराव गाडगीळ, शंतनूराव किर्लोस्कर, वालचंद हिराचंद ही नावे विसरताच येणार नाहीत. त्यांच्या बरोवरीने आणखी काही नावे घेता येतील. शिक्षण क्षेत्रात कर्मवीर भाऊराव पाटील, जे.पी.नाईक, मुंबईचे दादासाहेब रेगे, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ज्यांनी विश्वकोश निर्माण करून सगळ्या महाराष्ट्राला शिकवले

आणि महादेवशास्त्री जोशींनी संस्कृती कोश निर्माण केला. ही दोन नावे तर अग्रगण्य आहेतच. पण ताराबाई मोडक यांनाही विसरता येणार नाहीच. शिक्षणाच्या क्षेत्रात आणखीही बरीच नावे घेता येतील. क्रीडा क्षेत्रात आबासाहेब नातू ज्यांनी देशी खेळ या कल्पनेला उचलून धरले. दि. ब. देवधर ज्यांना 'क्रिकेट महर्षी' म्हणून गौरवले जाते. सुनील गावस्कर इत्यादी. कोणाला वाटेल सचिन तेंडुलकरचे काय ? तर त्याचा विचार २१ व्या शतकात करता येईल. त्याचे पुष्कळ आयुष्य घडायचे आहे पण मला आणखी एक नाव महत्त्वाचे वाटते ते म्हणजे मामासाहेब मोहोळ. ज्यांनी महाराष्ट्रातली कुस्ती जगवली, वाढवली. आता मामासाहेब मोहोळ म्हटल्यावर त्यात इतर सगळे पहिलवान आलेच. श्रीपती खंचनाळे, विष्णू नागराळे, मारुती माने, युवराज पाटील इ. आपल्याला असे दिसेल की, संरक्षणाच्या क्षेत्रात मोठी मोठी नावे होऊन गेली किंवा कोणी चांगले इंजिनिअर्स झाले, डॉक्टर्स झाले. त्यांची नावे तर अगणित घेता येतील पण नाटक, चित्रपट यामध्ये कोणाची नावे घेता येतील तर भालजी पेंढारकर आणि व्ही. शांताराम यांची. भालबा केळकरांचेही नाव घेतले पाहिजे. त्यांनी प्रोग्रेसिव्ह ड्रॅमॅटिकच्या रुपाने नाट्य क्षेत्रात पुढे पाऊल टाकले आणि श्रीराम लागू, चिंतामणराव कोल्हटकर, जो जुन्या पठडीतला माणूस पण त्याने नवीन काळाशी बरोबर जुळवून घेतले. विजया मेहता यांनीही जाणीवपूर्वक नवीन काही केले. चित्रपटक्षेत्रांत आणखीही काही नावे घेता येतील. साहित्य क्षेत्रात खांडेकर, कुसुमाग्रज, मर्ढेकर, आचार्य अत्रे, ग.दि.माडगूळकर, विजय तेंडुलकर, जाणीवपूर्वक नवीन लेखकांचा शोध घेणारे श्री.पु.भागवत ही मंडळी आहेत. तसेच दुर्गा भागवत, नरहर कुरुंदकर ही पण नावे घेता येतील. संगीताच्या क्षेत्रात भीमसेन जोशी आहेत. पण त्यांच्याबरोबर आणखी दोन नावे आपोआपच येतात. वसंतराव देशपांडे आणि कुमार गंधर्व. लता आणि आशा ही दोन नावे आली की, हृदयनाथ मंगेशकर वगैरे सर्व मंगेशकर मंडळी त्यात आलीच. सुधीर फडके, हिराबाई बडोदेकर, दादू इंदुरीकर, राजाराम शिंदे, राम कदम आणि विठाबाई नारायणगावकर या सगळ्यांनी महाराष्ट्राचे वैभव गेल्या ५० वर्षांत वेगवेगळ्या क्षेत्रांत वाढवले आहे. यात पु.लं. चे स्थान काय ? यातली २-३ क्षेत्रे वगळली तर बाकी सर्व क्षेत्रांत पुल सामावलेले आहेत. इतका चौफेर, इतका हरहुन्नरी, इतका लोकांमध्ये मिसळणारा म्हणून लोकप्रिय असे हे व्यक्तिमत्त्व आहे. त्यांना लाडके व्यक्तिमत्त्व म्हणणे थोडे चुकीचे वाटते. कारण आपण लाड कोणाचे करतो ? वाटेल त्याचे लाड केले जात नाहीत. 'आपला तो बाब्या असतो' त्याच्या हातून काही घडले नाही तरी त्याचे लाड केले जातात. पुलंचे तसे नाही. हे अस्सल नाणे आहे. याला, लाडके म्हणण्याच्या पलीकडे हे व्यक्तिमत्त्व गेले आहे. असा चौफेर, असा हरहुन्नरी म्हणून शतकांतून निदान अर्धशतकातून एकदाच होणारा असा हा पुरुषोत्तम आहे त्यांचे फक्त आपण गुणगानच करतो असे नव्हे तर त्याच्या मर्यादाही सगळ्यांना माहीत आहेत. पण त्याच्याबद्दल मराठी माणसाने कृतज्ञ राहिले पाहिजे.

❑ ❑

**डॉ. गं. ना. जोगळेकर**
२२, मनिषा सोसायटी, कर्वेनगर, पुणे.

# पुल : अनेक पैलू



राम गवाले

गेल्या ५०-५५ वर्षांच्या निकटच्या संबंधातून, चित्रपट क्षेत्रात एकत्र केलेल्या कामातून पुल आणि सुनीताबाई यांच्याशी स्नेहाचा, मित्रत्वाचा, जिव्हाळ्याचा संबंध आला, ही माझ्या दृष्टीने केवढी भाग्याची गोष्ट.

चित्रपट माध्यमातील निरनिराळ्या जबाबदाऱ्या पार पाडताना पुलंच्या व्यक्तिमत्त्वातील सारे पैलू एकमेकांना पोषक आणि पूरक ठरले आणि त्यांच्या नावामागं 'महाराष्ट्राचं लाडकं व्यक्तिमत्त्व' हे जिव्हाळ्याचं आभूषण जोडलं गेलं. मी दिग्दर्शित केलेल्या 'वंदेमातरम्' या १९४८ साली निर्माण केलेल्या चित्रपटात पुल आणि सुनीताबाई या दोघांनी नायक-नायिकेच्या भूमिका केल्या होत्या. पुढं 'जोहार मायबाप' नावाच्या माझ्या चित्रपटात त्यांनी चोखामेळ्याची प्रमुख भूमिका केली होती. माझ्या 'मोठी माणसं', 'देव पावला', 'घरधनी', 'दूधभात', 'देवबाप्पा' या चित्रपटांना त्यांनी संगीत दिलं होतं. मी दिग्दर्शित केलेल्या 'दूधभात', 'घरधनी', 'फूल और कलियाँ' या चित्रपटांच्या वेळी कथालेखक, पटकथा, संवाद-लेखन या भूमिकांतून काम करताना त्यांचा माझा संबंध आला. 'दूधभात' या चित्रपटाच्या वेळी तर चित्रपटाच्या संगीत दिग्दर्शनाबरोबर गीत लेखनाची जबाबदारी त्यांच्यावर आली होती आणि ती त्यांनी इतक्या सहजतेनं आणि यशस्वीरित्या पार पाडली, की त्याचं खरोखरच आश्चर्य वाटतं. ही सारी कामं ग. दि. माडगूळकरांच्या भाषेत सांगायचे तर मराठी चित्रपट क्षेत्रातले ते मंतरलेले दिवस होते. त्या काळातील एक प्रभावी मांत्रिक म्हणजे पुल.

नव्या तंत्रामध्येही मी अजून काम करतो आहे. परवाच व्हिडीओवर काम करत असताना अगदी सुरुवातीला कॅसेटवर कलर बार्स (Bars) आले. (तसे ते नेहमीच येतात) ते बघून पुल माझ्या मनात डोकावले. पुल या व्यक्तिमध्ये, त्यांच्या प्रतिभेमध्ये असे कितीतरी रंग आहेत आणि पुलंच्या मधील असे अनेक रंग, अनेक पैलू एक कुठे संपतो आणि दुसरा कुठे सुरू होतो हे कळतही नाही. म्हणूनच पुलंना उपमा द्यायची झालीच तर फक्त इंद्रधनुष्याची देता येईल.

१९४८ मधील 'वंदेमातरम्' या माझ्या पहिल्या चित्रात पुल नायक होते. आम्ही सर्वच १९४२ च्या चळवळीतून भारावून बाहेर पडलेलो, आणि त्यामुळेच 'वंदे मातरम्' हे चित्र करायला घेतले. माडगूळकरांची कथा, सुधीरचे संगीत, पुल नायक आणि सुनीताबाई नायिका.

या गृहस्थाला किती गोष्टींचा फायदा मिळत होता. माझं तर अवलोकन आहे की पुल अभिनय करताना, बोलताना त्यांच्यातील साहित्यिक, त्यांच्यातील संगीतकार या सगळ्याचा एक उत्तम अविष्कार होतो, याची अनेक उदाहरणे मी पाहिली आहेत.

'वंदे मातरम्' या चित्रात माडगूळकरांनी लिहिलेला एक सीन आहे. चळवळ चालू असते. हे



अनुक्रमणिका







भूमिगत असतात आणि ते ज्या ठिकाणी आसऱ्याला राहतात त्या ठिकाणी अतिशय बाळबोध, भावडी मुलगी असते. जिला राजकारण वगैरे कशाचीच काही कल्पना नसते. तर हा नायक स्वयंपाक घरात बसलेला असताना ती भावडेपणाने त्याला विचारते की केव्हा संपणार तुमची ही चळवळ ? त्यानंतर लिहिलेले वाक्य असे होतं की, 'चळवळ म्हणजे चातुर्मास होय ? आता पुलंनी चटकन् हे वाक्य न म्हणता लक्ष वेधून घेण्यासाठी एक पॉझ घेतला आणि हं हं चळवळ म्हणजे काय चातुर्मास आहे काय ? असं म्हटलं त्या पॉझमुळे बघणाऱ्यांचं ते काय म्हणतात त्याकडे लक्ष वेधलं जातं.

पुलंच्या बाबतीत अभिनय, संगीत दिग्दर्शन असे सर्व कप्पे पाडून लिहिता येणार नाही. कारण या माणसाच्या वागण्यातच असे कप्पे नाहीत. पुलंची वक्तृत्वशैलीसुद्धा अशीच सुंदर होती. मला आठवतं इचलकरंजीच्या साहित्य संमेलनात ते बोलले. आमच्या फिल्म इन्स्टिट्यूटच्या कॉन्व्हकेशनच्या वेळी बोलले, एक विषय घेऊन बोलले.

पुलंची व माझी ओळख कधीतरी काही लिहावं अशी सुरेख झालेली आहे. १९४३ साली त्यांचा व माझा परिचय झाला. तेव्हापासून त्यांच्या सगळ्या गुणांच्या, सगळ्या पैलूंच्या प्रभेमध्ये त्यांच्या सहवासात वाढलो, एकत्र राहिलो, मित्रत्वात राहिलो.

मला आठवतंय आमच्या या स्पॅनमध्ये एकदा पुल, दामू केंकरे आणि मी कॉलेजच्या गॅदरिंगच्या बक्षीस समारंभात गेलो होतो. विविध स्पर्धा होत्या. नाटकं होती. त्या नाटकाचे परीक्षक म्हणून आम्ही भारती विद्याभवनामध्ये गेलो होतो आणि गेल्यानंतर जे नाटक आम्हाला उत्तम वाटलं होतं त्याच्या ऐवजी सबंध विद्यार्थ्यांना निराळे नाटक असेल असे वाटले होते. मेडिकल कॉलेजने भाग घेतलेला, इतरही सगळ्या कॉलेजांनी भाग घेतलेला आणि त्यावेळी सगळे ओरडत होते. बुई वॉट अमूक आणि अमकं नाटक आलं पाहिजे म्हणून असं चाललेलं असताना पंचाईत अशी झाली की आता काय करायचे ?

त्यावेळी पुल शांतपणे उभे राहिले, आणि म्हणाले, 'खरं तर कॉलेजच्या या अशा स्पर्धांना परीक्षक म्हणून यायचे म्हटल्यावर आम्ही तिघेही जरा काचकूचतच होतो. यावं की नाही वगैरे. आम्ही तिघेही घरी सांगून आलोय दीड-पावणे दोन वाजले तर हॉस्पिटल्सना व पोलिस स्टेशनला फोन करायला सुरुवात करा.'

असं बोलल्याने समोरची मंडळीही कुठेतरी मित्रत्वात आले आणि म्हणाले की लोक म्हणतात— कॉलेजची मुलं म्हणजे वाह्यात. काय बोलतात काही कळत नाही. विशेषतः वडील मंडळी काय बोलतात जणू काही ही मंडळी कॉलेजमध्ये गेली नाहीत. आत्तापर्यंत एखादा बटाटा एक अंडेसुद्धा इथे आलेलं नाही आणि आम्ही कसं हे कबूल करावं आणि मग त्यांनी अतिशय गंभीरपणे सांगितले की, 'परीक्षक होणं म्हणजे अनेक दृष्टीकोनातून त्याच्याकडे पाहावं लागतं' असं शास्त्रोक्त रीतीने सांगून त्यांच्याकडे पाहून जो निर्णय होता तो निर्णय जाहीर केला. त्यांचा परिणाम काहीही झाला नाही. त्याच्या निर्णयाला विरोध दाखवायचा होता तो दाखवला गेला नाही.

पुलंच्या अनेक गुणांमध्ये उत्कट संवेदना हाही एक गुण होता. ही उत्कट संवेदना जरी असली तरी अभिनयाच्या बाबतीत सांगायचे तर त्यांनी मेलोड्रामा नेहमी टाळला आहे.

मी जोहार मायबाप नावाचं एक चित्र केलं होतं. माडगूळकरांची कथा होतीच. मी एकदा माडगूळकरांकडे गेलो, म्हटलं कथेत नामदेवांची व चोखामेळाची गाणी आहेत तेव्हा दोन अभंग लिहून हवे आहेत.

अण्णा म्हणाले, ''लिहू या ना. काही हरकत नाही. नाव ठरलं का ?''

'हो' म्हटलं. 'जोहार मायबाप' हे नाव पक्क.

''बरं तुझा 'चोखामेळा' ठरला का ?''

तर मी म्हटले, ''चोखामेळा ठरला पुल.''

'' अरे, चष्मा काढला की तो चोर दिसतो रे.'' ते म्हणाले.

आणि हे म्हणणारे अण्णा पुन्हा ज्यावेळी चित्र लागले तेव्हा म्हणाले, ''खरोखरी भाईंनी इतक्या भावडेपणानी काम केलंय. घोंगडी अंगावर घेऊन हा प्रोफेसर मनुष्य आर.पी.डी. कॉलेजचा, अतिशय सॉफिस्टिकेशननी बोलणारा, वागणारा, वाचन खूप असलेला, असा हा काय मस्त काम केलंय, मला म्हणाले, ''काय रे तुझा दोस्त हा ? माझ्या डोळ्यात पाणी काढले मी लिहिलेलं असून सुद्धा.''

सुधीर फडकेंनी याचं संगीत दिलं होतं. गाणं होतं, 'विठूचा गजर हरि नामाचा झेंडा रोविला.....' तर हे गाताना जे असे काही पाय वर करून म्हणाले की त्यांचं भजन एकूणच रंगून गेलं. त्याचा परिणाम असा होत असे की इतर गाणाऱ्या लोकांमध्ये तो जोश येत असे. अनेक चित्रांना त्यांनी म्युझिक दिलंय. कबीराचे विणतो शेले, कौसल्येचा राम, नाच रे मोरा आंब्याच्या वनात, वायदा केला विसरू नका याद ठेवा पक्की, जमलं तर आज या नाहीतर उद्या नक्की. आता हे लिहिलंयसुद्धा भाईंनी. पुन्हा त्याची कथा आहे निराळीच. अण्णा रूसले होते. नाही लिहिणार म्हणाले. शेवटी त्यांनीच लिहिली.

सबंध वातावरण भारून टाकण्याचं काम पुलंनी केलं.संगीत दिग्दर्शक म्हणून काम करू देत. पटकथा लिहायला बसू देत. संवाद लिहायला बसू देत. काम करायला बसू दे. संवादाच्या बाबतीमध्ये भाईच्या बाबतीत मी मोकळेपणानी सांगतो हा पक्का नकलाकार जर आठवत असेल तर संपूर्ण 'बटाट्याच्या चाळी' मध्ये अनेक नकला केल्या त्यांनी आणि जिथे ते स्वत:ची नक्कल करायला उभे राहतात, तिथे ते अस्सल होतं, त्या वेळी आपल्याला पुल देशपांड्यांची भेट होते. त्यांच्यापूर्वी ते अमके तमके सगळी जी चाळीतली मंडळी आहेत ती उभी करत आणि त्या नकलाकाराला या पुलंना काय आवडेल याचा काही हिशेब नाही.

आता कीर्तनाचंच घ्या. कीर्तन ही आमची अतिशय आवडती गोष्ट.

एकदा अत्रेसाहेबांनी संकट आणले होते. अत्रेसाहेब म्हणाले, ''आमचे कीर्तन आहे तासऱ्याच्याबाडला'' भाईला आणि मला म्हणाले, ''तुम्ही यायचे आणि तुम्ही साथीदार म्हणून

टाळ घेऊन उभे राहायचे.''

भाई पक्का, अहो, कुठे उभे राहायचे हो. कुठे ती उपरणी, विपरणी, पगडी घालून आवरत उभे राहायचे असे. तो म्हणाला, ''आम्ही आनंदाने उभे राहिलो असतो. पण आम्हाला तुम्ही समोरनं कीर्तन करताना बघायचे आहे हो. ते कसं काय जमणार ?''

अशी त्यांची स्टाईल होती. कीर्तन हा त्यांच्या आवडीचा विषय असुनसुद्धा तो जर रंगात आला,तर आठवण होते त्या गोटींची - पुलंना केव्हा काय सुचेल काही सांगता येत नाही. आमच्याकडे एक टवके नावाचा मेक-अप असिस्टंट होता. त्याला एक सवय होती की एखादा सीन सुरू झाला की त्या संवादानुसार त्याचेही हावभाव चालू असत. तर एकदा मला पुल म्हणाले, 'राम हा टवके बघ. हा कामिनी कौशलसारखा दिसतो की नाही. आता त्याला काय वाटेल पण त्यात तथ्य असे. आपण बघायला गेलो तर तो प्रोफाईल झाला की तो बरोबर कामिनी कौशल. अशा तऱ्हेने त्याच्यासारखं रसिक कोणी बघितला नाही. एखादी गोष्ट चांगली बघितली की ती आपल्या मित्रांनी बघावी इतकी इच्छा त्याची व्हायची. फोन करून एकदा ते म्हणाले, ''अरे राम, त्या वारणाच्या मुलाचं तू बघितलंस का रे.'' राम, पेटी वाजवायला बसला की डोळेच दिसतात. तबला वाजवायला बसला की तबलाच दिसतो. एव्हढी पोरं आहेत ती. पंढरपूरला मंगळवेढेकर जोपात वाजवतायत. तू फिल्म करतोयस तर एकदा फिल्म कर ते कळवळून म्हणत असत. असा रसिक मग त्याच रसिकतेतून त्याच गुणग्राहकतेतून.

बाबा आमटे, डॉ. कुमार सप्तर्षी, मेघा पाटकर किती मंडळींची नाव घ्यायची की ज्यांनी त्यांना भारून टाकलं आणि मग त्यांच्या लेखनात प्रकट झालं. कुठे संगीतकार भाई, कुठे लेखक भाई, कुठे अभिनेता म्हणून भाई कुठे सुरू होते, कुठे संपते हे अक्षरश: कळत नाही. इंद्रधनुष्यात देखील एक रंग दुसऱ्या रंगाच्या जवळ येतात तेव्हा निराळा रंग तयार होतो असे या माणसाच्या संबंध कामात घडलंय. या तऱ्हेने प्रत्येक काम करताना, लहान मुलाबद्दलचे संवाद लिहिताना याला असं भावत असेल नॉर्मली ते चटकन् स्ट्राईक होतं असे नाही.

पुलंनी चित्रपटासाठी अनेक प्रभावी कथा-पटकथा लिहिल्या, त्याचे संवाद लिहिले, त्यांच्या कथांतून जीवनातल्या अनुभूतींचा, संवेदनांचा पुन:प्रत्ययाचा अनुभव प्रेक्षकांना मिळत असे. माझ्या 'दूधभात' या चित्रपटाची कथा पुलंनी लिहिली होती.

लहान मुलांचे संवाद लिहिताना पुलं इतक्या हळुवारपणे लहान मुलांच्या मनात कसे डोकावून पाहत असतील याचं आश्चर्य वाटतं. दूधभातमधल्या एका प्रसंगात मुलाची आई त्याला पुस्तक पुढे ठेवून वाचायला शिकवीत असते. जणू एखादी गोट सांगत आहोत, असं आपण वाचून मग त्याला वाचायला, म्हणायला सांगते. ''कृष्ण गोकुळात रहत होता, रोज सकाळी तो नदीकाठी गाई घेऊन चरावयास नेत असे.'' आई वाक्याचा थोडासा भाग म्हणून त्याला तोच म्हणायला लावत असे. छोटा मुलगा, कृष्ण नदीकाठी गाई चरावयास नेत असे - असं म्हटल्यावरोबर विचारतो, ''आई, कृष्ण शाळेत जात नव्हता ?'' हा प्रश्न हे कुठलं मुल विचारील ? पण पुल मधला खट्याळ

मुलगा आहे ना तो या क्षणालाही आहे. त्यातून त्याने कोणालाही सोडले नाही आणि त्याच्या एका चित्रात एक असाच प्रसंग होता.

पूर्वीच्या काळच्या इराण्याच्या हॉटेलमध्ये एक फ्लॅप डोअर आणि आत लाकडी खुर्च्या असायच्या. त्याच्यामध्ये नायक आणि नायिका जर संधी मिळाली असली तर बसतात आणि आत बसल्यानंतर बाहेर बसलेल्या गिऱ्हाईकांचे लक्ष असते त्यांच्या पायाकडे, कुठे गडबड चालीय की काय ? या सगळ्यामध्ये हा विचारतो की, ''काय काय आहे ?'' ''ये है, वो है, वो है'' हा वेटर धडाघड लिस्ट घेतो. हा पुन्हा ''फिर एक दफा बोलो'' म्हटल्यावर तो सांगतो ''ये है, वो है, वो है.'' तो त्यातल्या अशा दोन गोष्टी निवडतो की त्या तयार व्हायला बराच वेळ लागेल. तो म्हणतो, ''ये लाओ और वो लाओ, जल्दी बनेगान ?''

''नही नही. इसको टाईम लगेगा साब !''

बरं ! फार चांगली गोष्ट, असं म्हणतो आणि ऑर्डर घेऊन जाताना वेटर दरवाज्यापर्यंत जाण्यापूर्वी तो म्हणतो, 'इकडे ये. ये लाओ और वो लाओ आणि वेळ लाओ'' हे जे त्याला काय सुचायचे - क्या बात है ।

भाईंबद्दल काय लिहायचे आणि काय नाही. खरोखरी त्याच्या वागणुकीत वैशिष्ट्य असे. त्यांच्या विनोदातलं त्यांच्या विनोदाची धार कधी कुणाला जखम करीत नाही. गुदगुल्या मात्र होतात असं हे शस्त्र आहे. त्यांनी घेतलेली फिरकी एखाद्याला बावडी उडवली वाटेल. जो बावडी उडवतो त्याला गंमत वाटते व ज्याची बावडी उडते त्यालाही गंमत वाटते.

आपल्याला ठाऊक असेल व्हीनसचे लिमये सगळ्या शाळा फिरायचे. शाळांमध्ये गोष्टी किंवा चांगले निबंध असत ते १०-१२ निवडायचे व 'माझे कौतुक' म्हणून एक पुस्तक काढायचे. ते पुस्तक म्हणून जे काढले त्यात मॉडर्न मधून माझ्या मुलाने सफरचंदाचे आत्मवृत्त लिहिले होते. एक शेवटचा टच कसा कोणाला ठाऊक. त्यात छान आलेला होता.

भाईंनी हे पुस्तक वाचलं आणि तो उठला, म्हणाला, 'अगं सुनीता, अगं रामच्या धन्यानी लिहिलंय हे काय सुरेख लिहिलंय बघ. म्हणाला, 'रामनी नक्कीच सांगितलेलं नाही. कारण रामला कुठलं एवढं चांगलं सुचायला.' एकदा आम्ही कामाला बसलेला असताना धुमाळ आले आणि धुमाळांनी कॅप घातलेली, मफलर गुंडाळलेला, शबनम बॅग लटकवलेली, कॅनव्हास बुट, सॉक्स असे आले, हातात काठी, आल्यानंतर म्हणाले, ''तुम्ही दोघे पण आहात का ?''

पुल म्हणाला, ''काय कुठनं आलाय ?''

''सज्जनगडाला गेलो होतो.''

''हो का ! आता काय म्हणतात त्या गडाला ?''

हे म्हटल्यावर आम्ही खळखळून हसलो तितकेच धुमाळही हसले.

माडगूळकरांच्या घरी एकदा आम्ही खूपच वर्षांनी गेलो. बरचे बर गाठी पडायच्या आमच्या पण त्यावेळी खरोखरीच मोठी गॅप पडली. अण्णा म्हणाले, ''अरे काय तुमचं काय ? तुम्हाला

काय मस्ती आली काय मस्ती आली काय ? तुमचा पत्ता काय ? तुम्ही काय भेटतच नाही. ''

पुल म्हणाले, ''अण्णा, कसे भेटायचे तुला इथे बाबा. तुझ्याकडे यायचं म्हणजे तीन फाटकं क्रॉस करावी लागतात. एक रेल्वे फाटक, एक तुझ्या बंगल्याचं फाटक आणि तिसरं बाबा फाटक — मधु फाटक.''

आता हे बाबाला कळलं त्याचा त्याला राग येत नाही. त्याला गंमत वाटते. या गंमतीतून स्वत:लाही स्पेअर करत नाही.

अशा पद्धतीनं आणि असं बोलता बोलता संवादातून हे जे सुचणं आहे हा हजरजबाबीपणा आहे, हा पटकथेत प्रसंग आणताना संवाद लिहिताना त्यांना अतिशय उपयोग पडला.

आता साधी गोष्ट आहे, सुनीताबाईंचा कधी कधी फोन यायचा काही विचारायला. भाई तिथं असला की मग तो पण बोलणार. तर एके दिवशी असाच सुनीताबाईंचा फोन आला की ''राम, अरे तुझ्या 'छोटा जवान' मध्ये भाईंनी काय केलं रे ?''

म्हटलं, ''काही केलेलं नाही, त्यांनी बघितलंसुद्धा नसेल.''

''नाही तो म्हणतोय की मी अमक्या वर्षी रामच्या कुठल्या तरी चित्रपटात काहीतरी केलंय.''

खूप चित्रपटात आम्ही कामे केली.

तर मी म्हटलं. ''कदाचित तो फुल और कलियॉ म्हणत असेल. का विचारतीयस ?''

तर मी म्हणाली, ''मी लिस्ट करतेय की भाईंचा कुठल्या कुठल्या चित्रांशी संबंध आला.''

तर मी म्हणालो, ''हे जर करतेयस ना तर एक चित्र लिहायचं विसरलं असेल आणि ते म्हणजे पुलंनी लिहिलेलं चित्र आज और कल म्हणून चित्र.''

सुनीता एकदम म्हणाली, ''हो की रे. आज और कल !''

हे शेजारी बसले होते म्हणाले, ''सुनीता, सुनीता रामला सांग की 'आज और कल' दोन दिवसच चाललाय आज आणि कल ! आता हा वार कोणावर झाला, स्वत:वर !

पुलंच्या घरी गेलं की सुनीताबाई म्हणायच्या पुलंना - हं, आता राम आलायना, तर काय साठलं असेल ना ते सांगून टाक. मग पुलंचा साठा सुरू व्हायचा.

कोल्हापूरचे इंग्रजी हा एक आमचा अत्यंत आवडीचा विषय होता. कीर्तनानंतर म्हणजे कोल्हापूरचे इंग्रजी आणि मग अरे राम, अरे किती दिवसांनी आपण भेटलो. हे बघ परवा कोल्हापूरला गेलो होतो आणि ज्यांच्या घरी गेलो होतो. तिथे बोलणं चाललं होतं. काही अर्थ राहिलेला नाही. क्वालिटी म्हणून काही राहिलेली नाही. काय कसलं ते टेनलेस (स्टेनलेस) टेनलेस ते पातेल्यात दूध तापविलं तर करपतं. तवा निघालाय कसला ? विमानाचा पत्रा का काय ते. त्यात भाकरी टाकली की करपतीय. सगळं करप्शन. हे जे काही साठलेलं असेल हे मला सांगावं. अशी त्याची भयंकर इच्छा होत असे. मग हे मी जाणार रे मला घाई आहे रे. मी जाणार आहे असं मी म्हटलं की कधीही जमत नाही ते कायमच आहे.

मी विजयनगर कॉलनीत रहात होतो. त्यावेळची गोष्ट. डाके क्लासेसच्या समोर चहा पीत

मागच्या गॅलरीत बसलेला असताना 'राम... राम....' जोरात हाका ऐकू येतावत. मी मीराला म्हणतो, (माझ्या मिसेसला) की अग भाई आहे नक्कीच पुल आहे. नक्की हाक मारतोय तो. मी बाहेर बघतोय तर मफलर बांधलेला, डोक्यावर टोपी असलेला नी, हाफपँट, सॉक्स, कॅनव्हास बुट आणि ज्यांची टिंगल आयुष्यभर केली असे सर्व पुणेरी कपडे घालून ते फिरायला निघाले होते. 'चल' म्हणाले. मी म्हटलं की माझे एकतर तुमच्यासारखे कपडे नाहीत. 'वर या'. वर या म्हटल्यावर वर आले. आम्ही गप्पा मारत बसलो. तास सव्वा तासांनी सुनीताचा फोन आला. ''राम, तुझ्याकडे भाई आला आहे का रे ? त्याच्याकडे फोन दे बघू.''

फोन दिला, '' काये रे तू रामकडे गेलास वाटतं फिरून येताना ?''

म्हणाले, ''नाही मी फिरायला गेलो नाही. मी इथेच आहे.'' असे हे पुल.

अनेक कलांच्या अनेक छटांच्या बरोबरच पुलंमध्ये होतं एक उमदं व्यक्तिमत्त्व. औदार्य असलेला सतत प्रसन्न असलेला हा माणूस कोणाशी वैर करणं किंवा संघर्ष करणं हे त्यांच्या रक्तातच नाही. संघर्ष करण्याची वेळ आली की मग ती वेळ विनोदानं मारून नेणं यांना उत्तम जमे. यांनी किती जणांना किती आनंद दिलाय. आणि जसा आनंद दिलाय तसा ढोंगी नाटकीपणाचा रागही केलाय.

आमचा 'देवबाप्पा' अलकाला लागला होता आणि भाई एस.पी. कॉलेजच्या मागे रहात असे. एक गृहस्थ आले. आल्यानंतर म्हणाले, ''आहात का. बा वरं झालं. आम्ही कामाला बसलो होतो. ''वरं झाले दोघे आहेत'' आणि ते गृहस्थ म्हणाले. ''अहो, काय हो चाललेय, देवबाप्पा... देवबाप्पा... कौतुक काही कळत नाही. मी बघितले. काही समजले नाही काय गोष्ट आहे ती.''

पुल पान खात असे त्यावेळी. आता तो उठला. मला वाटलं की पाय मोकळे होण्याकरिता उठलेत की काय कुणास ठाऊक. त्यांनी एक टाळी वाजवली आणि खाली जी पोरं खेळत होती. त्यातल्या एका मुलाला टाळी वाजवून हाक मारली.

''टाईम प्लीज म्हणून.... आलो भाईकाका'' म्हणाला व ताडताड जिने चढत वर आला. ''काय भाईकाका, काय काम आहे ?''

तर तो म्हणाला, '' हे बघ, तू देवबाप्पा बघितलास का ?''

''हो बघितला ना ! ''

'' का रे, देवबाप्पा म्हणजे काय ?''

''देवबाप्पा म्हणजे की नाही.... तुम्हाला माहीत नाही ? अहो ती एक चंदाराणी असते ना तिचे बाबा ना देवाघरी गेलेले असतात. मग ती काय करते की ......''

देवबाप्पाची गोष्ट १०-१५ वाक्यात त्या मुलाने सांगितली. तर 'पळ' भाई म्हणाले. अहो याला गोष्ट समजलीय आणि तुम्हाला काय प्रॉब्लेम आहे ? आमच्यापैकी एक दिग्दर्शक होते. तर हे दिग्दर्शक माडगूळकरांकडे आले. आल्यानंतर माडगूळकर म्हणाले की अरे छान चाललेय तुझे चित्र. तर ते चटकन म्हणाले अण्णांना, ' कसलं.... तसं पाहिलं तर तुम्हीच ही मूर्ती घडवली.

कसलं काय पुल म्हणाले तरीच मधनं मधनं तुमचा original दगड दिसतो हं ! पुलंना सारं काही आवडे मात्र ढोंग, नाटकीपणा याची भयंकर चीड त्यांच्यात होती. आणि ती त्यांच्या लिखाणातही आपल्याला दिसून येते.

आमच्या चित्रपट व्यवसायात भविष्य, जादु, श्रद्धा-अंधश्रद्धा यांना अति महत्त्व दिलं गेलंय. आमचे एक प्रोड्युसर होते. त्यांच्या पाकिटात पैसे सोडून रुद्राक्ष, गाजर, सुपारी असं काय काय असायचं. तसा विश्वास आमच्या विनायकरावांचाही होता. काळे नावाचे ज्योतिपी होते. शुटिंग सुरू करण्यापूर्वी त्यांना विचारले जाई. आणि एवढं असूनही यांचे चित्रपट पडलेच ना ?

अशा ढोंगांची तर पुलंना अतिशय चीड होती. मात्र स्वतःवर होणाऱ्या चेष्टा तो आनंदाने स्वीकारत असे.

एकदा मी असाच त्याच्या घरी गेलो. विपयामागून विपय निघाला. जुन्या आठवणी उजळून निघाल्या. म्हटले - पुल तुम्हाला कल्पना आहे का ? कॉलेजमधल्या मुली तुम्हाला काय म्हणतात? म्हटले, 'काय ?' मी सांगितलं. तुम्हाला त्या म्हणतात, 'दोन आऊट वत्तीस. आता दोन आऊट वत्तीस म्हणजे काय ? तर त्यांचे दोन दात पुढे होते. ते सशासारखे दिसत म्हणून 'दोन आऊट वत्तीस'. त्यांनी मनापासून दाद दिली. स्वतःचीही चेष्टा करून घेण्यास तयार होते ते.

मग केव्हातरी असेच इमोशनल होत. आणि मग एकटं पडल्याची भावना निर्माण होई.

मला आठवतं माडगूळकर गेले. तेव्हा आम्ही मुंबईहून पुण्याला आलो. त्यावेळी पुल म्हणाले, कसली घाई झाली होती रे कसली घाई....? एकदा केव्हा तरी असं बोलणं होताना मला म्हणाले, राम काय रे, तुझी धावपळ चाललीय. काय .... कुठे असतोस. तेव्हा माझं उत्तर एक ठरलेलं होतं की, 'हे बघा भाकरीचा वेग माझ्या वेगापेक्षा जास्त आहे. तो पकडायला धावावं लागतं. हल्ली जी येतात ती मार्गदर्शन विचारायला येतात. असं फिरक्या घ्यायला कोणी येत नाही.'

आयुष्यभर खट्याळपणा ज्यांनी जपला, तुम्हा आम्हाला दिला. मनमुराद हसवलं. आपल्या प्रतिभेनं साऱ्यांच्या मनात एक घर निर्माण केलं. आनंद दिला त्यातून उतराई होणं नाही.

❑❑

**राम गवाले**

२/८, चंद्रलोक नगरी, डहाणुकर कॉलनी, कोथरूड, पुणे ४११ ०२९.

---

*टीप : का. र. मित्र व्याख्यानमालेतील पु.ल.देशपांडे यांच्यावरील ६ लेख मागील अंकात प्रकाशित झाले. राहिलेले दोन लेख या अंकात प्रकाशित होत आहेत. प्रा. श्रीराम पुजारी आणि श्री. श्रीकांत मोघे यांचे लेख खूप प्रयत्न करूनही हाती आले नाहीत. त्यामुळे ते प्रकाशित होऊ शकले नाहीत.*

**— संपादक**

---



अनुक्रमणिका






# महानोरांची नक्षत्रे : काही वैशिष्ट्ये



डॉ. मनोहर जाधव

अर्धा डझनाहून अधिक संग्रहात महानोरांची कविता विखुरलेली आहे. एकोणिसशे साठपासून महानोर सातत्याने कविता लिहित आहेत. या लेखनात गुणात्मक वैविध्यही आहे. महानोरांची निसर्गकवी म्हणून जी प्रतिमा स्थापित झाली त्यामुळे त्यांच्या कवितेकडे एकाच दृष्टिकोनातून पाहिले गेले, मात्र अनेक शक्यतांचा विचार दुर्लक्षित राहिला. चांगल्या कवितेला नेहमी एकाच दृष्टिकोनातून पाहणे हे कवितेला अंशत: मारक ठरत असले तरी साहित्यसमीक्षा आणि वाचकव्यवहार अशा गोष्टींमुळे एकारला जातो. मूलत: चांगली कविता ही वहुमितीत्त्व धारण करत असल्यामुळे तुलनेने तिचे नुकसान होत नाही. मात्र समकालीन अनेकांगी साहित्यव्यवहारावर याचा परिणाम निश्चितच होतो.

* * *

ना.धों.महानोर हा कवी लोकजीवनात मिसळलेला - लोकजीवनाशी एकरूप झालेला आहे. लोकजीवनाची अंगभूत धाटी जशी या कवीच्या व्यक्तिमत्त्वात दडलेली आहे तशी समाजमानसाची व्यामिश्र प्रतिविंवे त्यांच्या कवितेत उमटलेली आहे. शेतकऱ्यांच्या दिंडीच्या निमित्ताने त्यांनी केलेली भ्रमंती असो अथवा अंत:प्रेरणेच्या ऊर्मींनी अजिंठ्याचा परिसर पिंजलेला असो. मानवी जीवनातील मोहविणारा मधाळपणा जसा या कवीला आकर्षित करतो तसा मनाला गुंतवून - गुंगवून टाकणाऱ्या प्रश्नांचा गुंता अस्वस्थ करतो. आपल्या सभोतालच्या परिसराचे, परिसरातील माणसाचे, निसर्गाचे, माणसाला हलवून टाकणाऱ्या - हतवल करणाऱ्या घटनांचे जवर-दस्त निरीक्षण या कवीजवळ आहे. हे केवळ तटस्थ निरीक्षण नाही तर जीवनानुभवातून प्रकटलेल्या चिंतनाचा स्पर्श या निरीक्षणाला लाभलेला आहे. त्यामुळे या कवीची कविता केवळ भाष्यासारखी अवतरत नाही तर ती माणसाशी संलग्न होऊन मुळासकट अभिव्यक्त होऊ पाहते. ठसठसणारे दु:ख, हेलकावणारी उदासीनता, अंतर्मुख करणारी शोकभावना, टिवकणारी संभ्रमित अवस्था या कवितेतून व्यक्त होताना दिसते. महानोरांची कविता निसर्गात रमते, हे तर खरेच आहे. पण केवळ निसर्गात रमणारी - रमवणारी ही कविता नव्हे. या कवितेला अनेक आयाम आहेत. अनेक मितीमधून ही कविता माणूस दृगोचर करते. माणसाला समजून घेण्याचा - समजावण्याचा प्रयत्न करताना दिसते. या प्रयत्नात हतवलता, विवशता डोकावत असली तरी माणसाच्या जीवनातील सनातन दु:ख शोधण्याचा या कवितेचा प्रयत्न दुर्लक्षित करण्यासारखा नाही. अनेक समीक्षकांनी महानोरांच्या कवितेतील निसर्गाचे विश्लेषण केले आहे. त्यांच्या कवितेतील निसर्गाचे भाववंध, रूपवंध उलगडून दाखविलेले आहेत. निसर्गाशी अटळ नाते सांगणारी, गीतात्मक लयवध्दतेने आविष्कृत

होणारी ही कविता मोठ्या प्रमाणात प्रणयभाव, सौंदर्यभावना आणि स्त्रीरुपांची अभिव्यक्ती करते हे नाकारण्याचे काही कारण नाही, किंवहुना हे या कवितेचे एक ठळक आणि अविभाज्य वैशिष्ट्यही आहे. तथापि एवढेच या कवितेत नाही. माणूस आणि निसर्ग यांचा अनुवंध या कवितेतून प्रकटताना दिसतो. या अनुवंधाचे आविष्करण तुलनेने मोठ्या प्रमाणात व्यक्त होत नाही हे खरे आहे. महानोरांच्या कवितेतून प्रकटणारा माणूस हा निसर्गाच्या प्रतिमेमधूनच प्रकटतो. याचे कारण कवीची जीवनशैली सांगता येईल. जीवन-शैलीशी इमानदारीने नाते सांगणारी ही कविता पानाफुलांची आहे तशी काही प्रमाणात शेतीमातीचीही आहे.

* * *

निसर्गाच्या माध्यमातून भावनाविष्कार करणाऱ्या आणि कल्पनाविश्व साकारणाऱ्या मराठीतील कवींची मोठी यादी उदाहरणादाखल देता येईल. मात्र निसर्गाद्वारे माणसासंबंधी काही सांगू पाहणारी कविता वेगळी ठरावी. ऐंशीनंतरच्या काही दशकांमधून अशी कविता समोर आलेली दिसते. या कवितेची अनेक ठिकाणी - अनेक प्रकारे चर्चा होत आलेली आहे. तिची मर्यादा आणि वलस्थाने सूचित केली गेलेली आहे. १९८५-९० नंतरची महानोरांची कविता केवळ निसर्गकविता म्हणून विचारात घेण्यापेक्षा अन्य दृष्टीनेही तिचा विचार करता येण्यासारखा आहे. भारतीय परिप्रेक्ष्या-तील ग्रामविश्व, ग्रामविश्वाशी संवंधित असणारी कृपिसंस्कृती, कृपिसंस्कृतीतील भौगोलिक - सामाजिक ताणतणाव या ठिकाणी

## ना. धों. महानोर

**कवितासंग्रह :** रानातल्या कविता, वही, पळसखेडची गाणी, पक्ष्यांचे लक्ष थवे, पावसाळी कविता, प्रार्थना दयाघना, गाथा, शिवरायाची, तिची कहाणी, पानझड (साहित्य अकादमी पुरस्कार प्राप्त)

**खंडकाव्य :** अजिंठा

**कादंबरी :** गांधारी

**कथासंग्रह :** गपसप, गावातल्या गोष्टी.

**व्यक्तिचित्रे :** ऐसी कळवळ्याची जाती

**संकीर्ण :** शेतकऱ्यांची दिंडी, यशवंतराव चव्हाण

काही प्रमाणात महानोरांच्या कवितेत दिसतात. खेड्यातील भावजीवनाला अर्थपूर्ण करणारे नातेसंवंध मानवी पातळीवर कसे स्खलनशील रूप धारण करतात याची बोचरी जाणीव या कवितेतून शब्दवद्ध होते. उदाहणार्थ -

*'साऱ्यांसाठी झाले उभ्या देहाचे सरण*
*सगेसोयरेही कधी जातात दुरून*
*फुले वेचताना सुद्धा ओथंवते मन*
*जन्माचेच ओझे पोटी घट्ट लपेटून'*

किंवा

*'मी म्हणालो : हे न माझ्या एकट्याचे*
*वांधिले मी पुण्य तुमच्या पावुलांचे*
*पाहिले डोळ्यांत त्यांच्या मी कितीदा*
*सोयरे माझे अचानक दूर झाले.'*

*अस्वस्थ करणारे, काळीज करपून टाकणारे*

हे दुःख आत्ममग्न नाही, ही मोठी जमेची बाजू या कवितेत आढळते. स्वकेंद्राबाहेर पडू पाहणारी आणि अवघी मानवता कवटाळू पाहणारी ही दुःखजाणीव मनाला कातर करणारी आहे. नितळ पाण्यामध्ये अकस्मात धोंडा पडल्यानंतर आणि अंतर्बाह्य पाणी डुचमळल्यावर नंतर धीम्या गतीने पाण्यात तरंग उठत रहावे आणि ा तरंगाने लांबचलांब वेटोळे एकापाठोपाठ ोणीत जावे तशी या कवितेतील दुःखजाणीव न:पटलावर उमटत जाते. दुःखाच्या तीव्रतेमुळे ालेले घुसमटलेपण वारंवार या कवितेत धोरेखित होत राहते. कवितेतून प्रकटणारे डद गहिरं दुःख कवीच्या प्रकृती वैशिष्ट्यामुळे समुसळेपणाने व्यक्त होत नाही. पचविलेले ख कळत - नकळत अलवारपणे अभिव्यक्त ते. त्याचा ओरखडा शब्दातून कुठे उठत नाही. ात्र या दुःखाने इच्छा असूनही खपली धरलेली ही, असे सतत वाटत राहते. ही दुःखजाणीव ककळीपणे ठसटसत नाही तर ती कथन करीत हत राहते आणि त्याचवेळी वैश्विकतेशी, ूहभावनेशी तादात्म्य पावते. समूहात्मक कजीव दुःखानुभव मग चिंतनशीलतेच्या तळीवर रेंगाळत राहतो. त्यामुळेच तो धेकाधिक अस्वस्थ करीत जातो.

मानवी नात्यांतील अनिवार्य परावलंबित्वा- ळे निर्मात होणारी पोकळी, भावविश्वाला ध्वस्त करू पाहणारा व्यावहारिकतेचा विघेणा रेटा, निरपेक्ष भावनेने निथळत जाणारे तेसंबंध आणि या नातेसंबंधातील प्रेमाला चविणारे अतर्क्य वास्तव, या गोष्टी ानोरांच्या कवितेत सहजपणे आविष्कृत ात. लोकगीतांच्या संस्कारातून तयार झालेली कवीची मूस आपली मूक वेदना शब्दांकित करताना आक्रोश करीत नाही. वर म्हटल्याप्रमाणे कवीचा प्रकृतीपिंड याला कारणीभूत आहे. दुःखाला समजून घेण्याची, पचविण्याची मानसिकताही या ठिकाणी दिसते. नात्यांतील दुःखाचा शोध घेताना ही कविता आपल्या जगण्याचाच आविष्कार सरळ सरळ व्यक्त करते. म्हणून जगणे आणि जगण्यातील दुःख या कवितेत एकरूपतेने - अभिन्नतेने समोर येते. उदाहरणार्थ,

*'आई, गलवलून यायची आभाळासारखी*
*मला कुरवाळत बसायची.*
*दाट काळोख्या रात्री*
*आई कशासाठी रडायची*
*मला कळलंच नाही कधी.*
*सबंध आयुष्याचं पीठ झालेलं. तिच्या*
*अंगावर सुरकुत्या तेवढ्या दुःखाची वरवट*
*अंगावर ग्रासून टाकणारी'*

किंवा

*'वाटा गेल्या दूरदेशी*
*तरी मन घोटाळावे*
*कधी तुडुंब दुःखात*
*डोळे माहेराला यावे'*

किंवा

*'भल्यासाठी खेड्याच्या ह्या आख्खे काही केले*
*भरलेल्या आयुष्याचे क्षण त्यांना दिले*
*पाहिले मी माझ्यासाठी फास बांधणारे*
*ज्यांना माझ्या भाकरीचे अर्धे घास दिले.'*

तुडुंब आणि काठोकाठ दुःख सोसणारा माणूस हा वेगवेगळ्या प्रतिक्रियात्मतेतून प्रकट होतो. आक्रोश, विद्रोह, करुणार्द्रता अशी काही रूपे याबाबतीत संभवतात. महानोरांच्या

कवितेतील दुःख आपापतःच करुणेची झालर लेऊन येते. काही कारणामुळे नात्यात येऊ पाहणारा विसविशीतपणा, कोरडेपणा इथे मुद्दाम लक्षात राहतो. पायामधल्या कुरुपाने सतत सलत रहावे तसा या कवितेतील वेदनेचा सल जाणवत राहतो. कवितेच्या सहजसुलभ नैसर्गिक आविष्काराची ताकद इथे लक्षात येते.

*'सारा स्वार्थाचा गल्बला*
*भाऊवंद झाले गोळा*
*आणि पसार होताना*
*संसाराचा चोळामोळा'*

सांसारिक जीवनातील चिरंतन सत्याची ओळख करून देताना कवी अगतिक होत नाही. प्राप्त परिस्थितीत सत्याला सामोरे जाऊन तावून-सुलाखून निघणे ही एक अटळ परिणती या ठिकाणी जाणवते. ही कौटुंबिक जीवनातील एक बाजू आहे. मात्र व्यापक सामाजिक स्तरावर जगताना माणसाला इच्छा असो - नसो, बहुजिनसी संघर्षाला भिडावे लागते. हे टाळता न येणारे वास्तव देखील महानोरांच्या कवितेत दिसते.

*'सांगावी वेदना कोणी ऐकेनाच कोणी*
*त्यांच्या आसनाला नाही दुःखाची लागणी*
*लाख येवो मोर्चा ह्यांची मात्र पूजाअर्चा*
*राज्य बुडो आले तरी वांझोटीच चर्चा'*

भोवतालच्या सामाजिक - राजकीय वास्तवाचे चिंतन हा आणखी एक निराळा पैलू महानोरांच्या कवितेत आढळतो. एका व्यापक पातळीवरील जीवनाचे अंतर्भेदी सूक्ष्म चित्रण करताना हा कवी अभिनिवेश बाळगत नाही. निर्लेप आणि तटस्थ राहून केलेल्या नोंदी विस्कटलेल्या खेड्याचं दारुण रूप चित्रित करतात. सभोवतालचं जग मूल्यात्मकदृष्ट्या स्थित्यंतरित होऊ पाहत आहे. आणि अशा संक्रमणावस्थेतील मानसिक कुतरओढ कवी थेटपणे कोणताही आडपडदा न ठेवता शब्दबद्ध करतो. महानोरांच्या कवितेतून प्रकटणारी सामाजिक जाणीव त्यांच्या कवितेला एक वेगळे परिमाण देते. 'रानातल्या कविता', 'वही', 'अजिंठा', 'पावसाळी कविता', 'पळसखेडची गाणी' या संग्रहातील कविता ही निखळ आत्मनिष्ठ आणि सौंदर्यासक्त अशी कविता आहे. वाटांवर, पावसावर, झाडांवर आणि पक्ष्यांवर जीव ओवाळून टाकणारी ही कविता पुढे पुढे फाटक्या संसारावर, अश्रूत दडलेल्या हुंदक्यावर, सैरभैर झालेल्या खेड्यावर आणि कचकडी नात्यांवर प्राण कंठाशी आणून बोलते तेव्हा या कवीचा एक प्रगल्भ आणि अर्थपूर्ण काव्यप्रवास दृष्टिपथात उभा राहतो. 'प्रार्थना दयाघना' 'पानझड', 'गाथा शिवरायाची' 'तिची कहाणी' अशा संग्रहातून भेटणारी महानोरांची कविता त्यांच्या पूर्वप्रतिमेला छेद देणारी आहे. हा छेद अनेक दृष्टीने महत्त्वाचा आहे. काव्यप्रवासातील तो एक विकासोन्मुख टप्पा आहे.

कवीची वैचारिक आणि सामाजिक दृष्टी अधोरेखित करणारी ही कविता एका निश्चित भूमिकेचे सूचन करते. एकीकडे स्त्रीची वेगवेगळी रुपे शब्दांकित करणारे महानोर दुसरीकडे मानवी जीवनातील दुःखाचे निरनिराळे पदर रेखाटतात. तेव्हा त्यांनीच निर्माण केलेल्या एका चाकोरीपुढे जाऊन नवे आलेख प्रस्थापित करतात. आपल्या माणसांसंबंधी, अनुभवविश्वासंबंधी आणि त्याबरोबरच अंतःप्रेरणेसंबंधी संवादी

भूमिका घेतात. या अर्थाने महानोरांच्या कवितेने एकसूरीत्व नाकारले आहे आणि तिची बहुपेडीत्वाकडे सशक्त वाटचाल सुरू आहे. आपल्या निर्मितीसंबंधी सजग असणाऱ्या कवी- कलावंताची ही अंतर्दृष्टी फार थोड्या कलावंताजवळ असते. त्यामुळेच हा कलावंत आपल्याभोवती आपणच आखलेल्या रिंगणाला छेद देऊ शकतो. सृजनशीलतेचा विकसनशील अनुबंध त्यातून प्रत्ययास येतो.

स्वातंत्र्यानंतर सैरभैर झालेली, देशोधडीला लागलेली खेडी महानोरांना बेचैन करतात. खेड्यांच्या जीवावर पोसली जाणारी आणि उत्तरोत्तर सुखासीन होत जाणारी शहरे, हे द्वंद्वात्मक वास्तव कोणाही संवेदनशील कलावंताला, मातीशी नाते सांगणाऱ्या भूमिपुत्राला अस्वस्थ करणारच. तथापि या भौतिक जगातील मानवनिर्मित विषण्णता ही अधिक भयावह आहे. अंतर्यामी पोखरून टाकणारे काळजातले दु:ख महानोर असे सांगतात :

*'स्वातंत्र्य आलं*
*सुखाचं हिरवेण*
*शहराला गेलं*
*शेतीच्या आयुष्याला*
*गाडगं - मडकं आलं'*

या भयव्याकूळ वातावरणातील असुरक्षितता माणुसकी कुंठीत करणारी आहे. पोरीबाळींच्या रक्तात भिजलेल्या लालजर्द आरोळ्या थरकाप उडविणाऱ्या आहेत. जातीला खतपाणी देऊन त्यावर दंगलीची पिके घेणारी आणि आपली सिंहासने मजबूत करणारी अप्पलपोटी खादीधारी मंडळीही या कवितेचा विषय होतात. संस्थात्मक जाळे प्रगतीसाठी उभारण्याऐवजी स्वार्थासाठीच मंडळी संस्थानिक झालेली दिसतात आणि त्यामधून जी सर्वंकष शोषणाची प्रक्रिया उभी राहते ती कवी नजरेआड करू शकत नाही. अशा अस्मानी - सुलतानी कचाट्यात सापडलेले जीवन मुक्त व्हावे म्हणून दयाघन आभाळाला प्रार्थना करणारा कवी आशावादी दिसतो. माणसावरील त्याचा विश्वास उडू पाहात असला तरी निसर्गावर मात्र ठाम भरवसा आहे. भोवतालच्या विसंवादाची जाणीव चित्रित करताना कवी म्हणतो,

*'किती ढोसाव्यात काड्या*
*चूल पेटता पेटेना*
*करपल्या भाकरीचा*
*घास गळा उतरेना'*

काळीज फडफडवणारी, रित्या मनाचे जागते चित्रण करणारी महानोरांची अलिकडची कविता ही विशेष संबोधनाच्या / वर्गीकरणाच्या पलीकडची आहे. कोणत्या तरी चौकटीत ती ठोकून ठाकून बसवावी आणि ॲकॅडेमिक गुऱ्हाळात रवंथावी अशी ती नाही. खरे तर कोणत्याही चांगल्या कवितेबाबत हे म्हणता येईल. सेमिनारबहाद्दर समीक्षकांची तमा न बाळगणारी, आपल्या वैविध्यपूर्ण आणि वैचित्र्यपूर्ण अनुभवाशी इमान राखणारी, आपल्या कवितेने कोणत्यातरी एकाच छंदात अवतरावे असा आग्रह न धरणारी ही कविता स्वयंभू नक्षत्रासारखी आहे. मराठी कवितेत नक्षत्रांमागून नक्षत्रे आली काय किंवा कवींचे लक्ष थवे गेले काय, शाश्वत मानवी भावनेचे आणि मूल्यांचे तिचे भान सुटणारे नाही.

'पानझड'मध्ये महानोरांच्या कवितेतील

भिन्न प्रकृतीची चित्रे उमटलेली आहेत. या संग्रहातील कविता कोणताही एक विवक्षित दृष्टिकोन अभिव्यक्त करीत नाही. या संग्रहात वेगवेगळ्या भावछटा निरनिराळ्या छटांमधून प्रकट होत जातात. महानोरांच्या कवितेतील लयबद्धता, पालखीच्या अभंगातून प्रकटणारी आर्तता, ओढ्या-मळ्याच्या साहाय्याने उमेलणारी-फुलणारी प्रणयरम्यता, हिशेबी जगात चलाखपणे वावरता न आल्यामुळे येणारी उदासीनता अशा वेगवेगळ्या संमिश्र भावनांचा एक आलेख या कवितेत अधोरेखित होताना दिसतो. या संग्रहातील कविता कवीच्या भावविश्वातील अंतरंगाची नव्याने ओळख करून देते. महानोरांचा निसर्गकवी म्हणून होणारा उल्लेख हा अपुरा आहे. याची जाणीव या संग्रहातून होते. आपल्या अनुभवसंचिताची मोकळी, अनिर्बंध अभिव्यक्ती महानोरांनी काव्यातून व्यक्त केली आहे. यातील काव्य-मूल्यांबरोबरच जीवनाशयातील बहुविधता ही मोलाची आहे. जीवनातील संघर्षाला भिडण्याची अनिवार्यता या कवितेतून प्रकट होते तशी आनंदाच्या - सुखाच्या क्षणांना कवेत घेण्याची अभिलाषाही या कवितेतून व्यक्त होते. मानवी भावभावनांची सरमिसळ प्रभावीपणे प्रकट करणारी ही कविता माणसाच्या सुखः दुखाला समजून घेण्याचा, त्याच्या जीवनात अविकारी आनंद निर्माण करण्याचा प्रयत्न करते. कोणत्याही चांगल्या कलेचे हेच प्रयोजन असते, महानोरांची कविता या प्रयोजनाला अपवाद नाही.

*'सूर्यनारायणा नित नेमानं उगवा*
*अंधाराच्या दारी थोडा उजेड पाठवा*
*ओंजळीनं भरू देगा पाखरांच्या चोची*
*दुःखात पंखांना असो सावली मायेची'*

अशा तऱ्हेने अंधाराच्या दारी उजेडाची वाट पाहणारी आणि दुःखातही आपल्या पंखांना मायेच्या सावलीचे वळ मागणारी ही कविता खऱ्या अर्थाने माणसातल्या माणसाचीच कविता आहे आणि म्हणूनच ती महत्त्वाचीही आहे.

* * *

महानोरांची प्रामुख्याने कवी म्हणून प्रसिद्धी असली तरी त्यांनी लक्षणीय गद्यलेखन केलेले आहे. 'गपसप', 'गावातल्या गोष्टी (कथा-संग्रह), 'गांधारी' (कादंबरी) आणि 'ऐसी कळवळ्याची जाती' (व्यक्तिचित्रे) ही वेगवेगळ्या वाङ्मय प्रकाराशी नाते सांगणारी पुस्तके पाहिली तर महानोरांच्या ललितगद्य-लेखनाचे वेगळेपण लक्षात येते. शेतकऱ्यांच्या प्रश्नांसंबंधी समाजात जागरूकता निर्माण करण्यासाठी काढलेल्या दिंडीसंबंधीचे अनुभव 'शेतकऱ्यांची दिंडी' मध्ये वाचायला मिळतात. यशवंतराव चव्हाणांच्या सहवासातील आठवणींनाही त्यांनी 'यशवंतराव चव्हाण' या पुस्तकात शब्दबद्ध केले आहे. खरे तर महानोरांच्या गद्यलेखनासंबंधी तपशीलाने विचार करणे गरजेचे असूनही 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'च्या उपलब्ध पृष्ठमर्यादेतील प्रस्तुत लेखामध्ये ते शक्य झालेले नाही. मूलतः कवीचा पिंड असणाऱ्या कलावंताच्या गद्यलेखनात कवीप्रकृतीचे प्रतिबिंब न्याहाळता येते किंवा कसे हा विचार करता येऊ शकेल. गद्य-लेखनाच्या प्रेरणांचा शोध आणि कारणे यांचीही मीमांसा करता येणे शक्य आहे. आपल्या



अनुक्रमणिका

वाङ्‌मयीन वाटचालीत आणि आयुष्याच्या अनेक वळणांवर जे जिवलग स्नेही लाभले त्यांचे हृदयस्पर्शी चित्र महानोरांनी 'ऐसी कळवळ्याची जाती' मध्ये केले आहे. काव्यमय शीर्षकाच्या या पुस्तकात महानोरांचा गोतावळा पाहायला मिळतो. एका संपादकाने आपल्या 'तल्लख कंपू' च्या साह्याने काही दुरुस्त्या रुचविल्या तरी स्वत:च्या लेखनावद्दलची भूमिका निश्चित असल्यामुळे महानोरांनी 'गांधारी' वर संस्कार केले नाहीत. 'गांधारी' चे मूळ रूप त्यांनी कायम ठेवले. 'गावातल्या गोष्टी' मात्र इतक्या अस्सल स्वरूपात प्रकट झालेल्या आहेत की या गोष्टीतील माणसे लेखकाच्या जीवनाचाच एक भाग म्हणून लक्षात राहतात. या कथा ठसठशीतपणे अभिव्यक्त झाल्या आहेत. या कथासंवंधी विवेचन करण्याचा प्रयत्न या ठिकाणी केलेला आहे.

'गावातल्या गोष्टी' मध्ये खेड्यातील परिसर चित्रित झाला आहे. महाराष्ट्रातील कोणत्याही खेड्यातील परिसराला लागू पडावे असे प्रातिनिधिक चित्र या कथांमधून महानोरांनी रेखाटले आहे. तथापि गोष्टीतील माणसे खानदेशी वोली भाषा बोलत असल्यामुळे खानदेशातील लोकांचे जीवन किंवा खानदेशातील खेड्याचे चित्रण महानोरांनी रेखाटले आहे असे म्हणता येते. तथापि हा खेड्यातील परिसर आणि जीवन महानोरांच्या अनुभवाचा भाग असल्यामुळे ते स्वाभाविकही आहे. ग्रामीण जीवनावरोवरच व्यक्तींचे भावजीवन एकात्मतेने या गोष्टीतून सजीव झालेले आहे. 'गावातल्या गोष्टी' ग्रामीण साहित्यात मोडतात की प्रादेशिक साहित्यात, हा ॲकॅडेमिक तपशीलाचा भाग झाला. या कथांमधील नाट्यमयता आणि रसरशीत भावाविष्कार नजरेत भरावा इतक्या सकसतेने या कथा वाचकाच्या हृदयाला हात घालतात. व्यक्तिचित्रे आणि कथा यांच्या सीमारेषा 'गावातल्या गोष्टी' त एकजीव झालेले दिसतात. भिववा (भुताटकी) ह.भ.प. महादेववुवा सुरेभानवुवा (अवघड) सीताराम (सवंगडी) राधा (अवदसा) या व्यक्ती कथांच्या केंद्रस्थानी असल्यामुळे साहजिकच या व्यक्तींवर झोत राहतो. मात्र कथेच्या प्रकृतीला त्यामुळे वाधा संभवत नाही. कथेतील प्रमुख व्यक्तिरेखा ठळकपणे कार्यकारणभावाशी संवंधित राहून कथेच्या व्यूहाला अधिक अर्थपूर्ण वनवितात. आपले गहिरेपण वर्तनातून आणि विकारातून ठाशीवपणे मांडत जातात. कथेचा घाट प्रमुख व्यक्तिरेखांसह जीवननाट्याचा एक मोठा पट उलगडत जातो. कथा आविष्कृत होताना केवळ आशयसंवंध राहत नाही., ती जीवनातील विवक्षित अनुभवांसंवंधी उलट भाष्य करू पाहते तथापि भाष्य करण्यासाठी ही कथा अवतरत नाही, हेही खरे. अभिप्रेत भाष्यामुळे ती वोधात्मक, प्रचारकी अथवा एकसुरी होत नाही. मुळातील जीवनानुभव व्यामिश्र, जटिल असल्यामुळे त्यातील नाट्यात्मकता अधिक गडद होत जाते. कथेतील नाट्यात्मकतेबरोवरच व्यक्तीव्यक्तींमधील परस्परसंवंध, या संवंधातील मूल्यभावात्मक संघर्ष आणि विकारविशताही अधिक प्रत्ययकारीपणे प्रकट होते.

'गावातल्या गोष्टी' तील माणसे निखळ प्रामाणिक आहेत. ती चुका करतात पण वोभाटा

करीत नाहीत. ती गरजू आहेत पण वनेल नाहीत. ती स्खलनशील आहेत, पण मतलवी नाहीत. मनाने निर्मळ असणाऱ्या या माणसां-सोवत सभोवतालच्या सामाजिक - सांस्कृतिक परिघाचाही परिचय होत जातो. किंवहुना या परिघाच्या संदर्भातच माणसांचा विचार करणे क्रमप्राप्त ठरते.

महानोरांचे अनुभवविश्व वैविध्यपूर्ण आहे. त्याचा प्रत्यय या कथांमधून येतो. फारशी न शिकलेली मात्र जिवाचे मैत्र असलेली माणसे या ठिकाणी भेटतात. कळत-नकळत मनावर ठसा-संस्कार उमटवून गेलेली माणसे इथे दिसतात. वऱ्या-वाईट अनुभवातून तावून-सुलाखून निघालेली ही माणसे आपल्या चाकोरीवद्ध जीवनात गुरफटतात तर कधी फरफटत जातात. महानोरांनी केवळ माणसे पाहिली नाहीत, त्यांची निरीक्षणे केलेली नाहीत तर प्रत्यक्ष ती अनुभवली आहेत. ती माणसे चारचौघांसारखी सामान्य आहेत. या सामान्य माणसांनी लेखकाचे भावजीवन समृध्द आणि संपन्न केले आहे. ही माणसे परिस्थितीवश उसवत गेली, कोसळत गेली आणि काळाच्या पडद्यावर एक प्रतिमा ठसवत गेली. नात्यातील तरण्याताठ्या मुलीने गावातील मुसलमानावरोवर विनधास्त संवंध स्थापित केल्यामुळे भिववा काऊन जातो (भुताटकी) अंतर्वाह्य तगमगीमुळे आणि समाजाच्या नजरेतील जाळामुळे विध्द झालेला भिवबा तिरमिरीत गुंजीवर कुऱ्हाड चालवतो. निसटता वार खाऊन गुंजी चपळाईने निसटते आणि नाकेदार, पोलिस शिपायांपासून वचाव करण्यासाठी भिववा रानातल्या गुहेत दडून वसतो. स्वसंरक्षणार्थ लपलेला भिववा रात्री अस्वलाच्या मादीपासून स्वतःला वाचविण्या-साठी तिला कुरवाळू लागतो. परिणामतः रोमांचित झालेली अस्वलमादी भिववाला अधिकच खेटू लागते आणि प्राप्त परिस्थितीत कोंडीत सापडलेला भिववा अफुतल्या गुंगी-सारखा मादीला भिडतो. मुसलमानाशी संग करण्याऱ्या गुंजीमुळे क्रोधित होणारा भिववा आणि अस्वलाच्या मादीशी रूद्रेश्वराच्या मंदिरात संग करणारा भिववा ही एकाच व्यक्तीची दोन रुपे विरोधात्मक पद्धतीने समोर येतात. तथापि या विरोधात्मकतेतून कथेचे विकसनशीलत्व घडू पाहते. समाजाच्या नाकावर टिच्चून धडधडीत वेलगामपणे वागणारी गुंजी आणि स्वतःच्या वचावासाठी का होईना अस्वलमादीशी झुलणारा भिववा, या दोन व्यक्तींमधील प्रवृत्तीच्या साम्याचे सूचन कमालीच्या ताकदीने चित्रित करून लेखक काही प्रश्न आपसूक उभे करतो. या प्रश्नांची वर्गवारी नैतिक-अनैतिक अशा पद्धतीने करून शाळकरी चर्चा संभवली तरी ती प्रस्तुत ठरत नाही. मूळ जीवनकलह आणि सामाजिक चौकटीत गुदमरलेली मूळकल्पना या ठिकाणी अधोरेखित होते. हा भाग समजून घेतला तर नैसर्गिक वाटू शकणाऱ्या घटनांची एक तार्किक संगती या ठिकाणी पाहायला मिळते.

जीवघेण्या आजारातून वरा होत जाणारा सीताराम मळ्यात राहतो. दवाखान्यातील दवा-दारूमुळे वरा न झालेला सीताराम पथ्यपाणी पाळत नाही. गर्भार पत्नीशी रत झाल्यामुळे शक्तीपात होऊन तो खलास होतो. नवऱ्याची इच्छा पूर्ण करणारी मुक्ता वाचकाच्या मनात घुटमळत राहते तसेच सवुरी नसणाऱ्या

सीतारामवर वैतागणाऱ्या मित्राला शांत करणारी मुक्ताही मनाचा ठाव घेते. समोर येणाऱ्या कडवट आणि धडधडीत सत्याला निमूटपणे तोंड देते. शरीराच्या चोचल्यासाठी आपल्या मुलाला सुनेनेच फशी पाडले असा त्रागा करणारा सीतारामचा वाप आकांडतांडव करतो तरीही मुक्ता शांत राहते. मौन वाळगते. नवरा गेल्यावर मात्र तिची ससेहोलपट होते. मुलीला जन्म देते. माहेरी जाऊन राहते. दारूच्या आहारी गेलेला वाप पैशाच्या आमिपाने तिचे लग्न एका थेरड्यावरोवर लावून देतो. उर्वरित आयुष्य मग ती जमेल तसे ओढत नेते. तिच्या आयुष्याची फरफट होते. सीमारामपासून मुक्ताच्या पोटी जन्माला आलेली मुलगी लग्न होऊन सासरी जायला निघते तेव्हा या साऱ्या घटना चित्रचित्रासारख्या लेखकाच्या डोळ्यांसमोर तरळत जातात. या कथेची मांडणी इतकी परिणामकारक झाली आहे की, सीताराम, मुक्ता, त्याची मुलगी, सीतारामचे आख्खे कुटुंब या सर्वांवावत मनामध्ये एक करुणाभाव दाटून येतो. आपल्याभोवतीच्या माणसांची ही रूपे चकित करीत नाहीत तर अंतर्मुख करतात. अस्वस्थ करून विचार करायला भाग पाडतात.

एका गाफिल क्षणी, काळोख्या रात्री घरात पत्नी झोपली आहे असे समजून आईला विलगणारा - झोंवणारा महादेव पश्चातापाच्या आगीत होरपळून निघतो. (अवघड) जगावे की मरावे या द्वंद्वात सापडलेला महादेव स्वतःच्या इंद्रियावर वार करून घेतो मात्र तरीही त्याला मरण येत नाही. आपण आता वायकोला सुखी ठेवू शकत नाही आणि वस्तुस्थितीही सांगू शकत नाही या पेचात सापडलेला महादेव गळा दावून वायकोचा खून करतो आणि घटसर्पानं मेल्याचा कांगावा करतो. घर सोडून वणवण फिरतो. संन्याशी होतो. या संन्याशाची कीर्ति गावागावात पसरते. मात्र महादेवच्या मनातील सल काही केल्या जात नाही. आपले वर्तन, जगरहाटी, माणसातील पशूत्व मनातील पोकळी याची वाच्यता तो फक्त 'अवघड' या शब्दातून व्यक्त करतो. मानसिक शांततेसाठी भणंगा-सारखा फिरणारा महादेव वाचकाचा एका परीने पाठलाग करतो. 'अवघड' कथेतील आशयवस्तू मनाला हलवून टाकणारी आहे. माणसाची नैसर्गिक प्रवृत्ती आणि अधःपतनामुळे निर्माण होत जाणारी मानसिक पडझड या कथेत 'महादेव' च्या रूपाने आविष्कृत होते. अंगावर येणारे सत्य आणि या सत्यापासून तोंड लपवू पाहणारा, महादेव पळपुटा वाटत नाही. त्याच्या मनातील कुतरओढ त्याला अस्वस्थ करते. मनात ठसठसणारे दुःख तो कोणाजवळ सांगू शकत नाही. लेखकाला अकल्पितपणे तो प्रवासात भेटतो. वाहतूक ठप्प झाल्यामुळे प्रवासी रस्त्यावर रेंगाळतात. लेखकाला रस्त्याच्या वाजूला लोटगाडी दिसते. 'ह.भ.प.महादेववुवा सुरेभान वुवा (संत सावता माळी) मु. पो. पळस-खेडे. ता. सायगाव (महाड)' ही लोटगाडीवरील पाटी लेखकाचे लक्ष वेधून घेते. ओळख पटते. झाडाखाली वसून मनातील भडभड महादेव लेखकाला सांगतो आणि मन मोकळे करतो, मग दिसेनासा होतो. माणसाच्या आवाक्यावाहेरील, अनियंत्रित परिस्थितीचा महादेव असहाय वळी आहे. त्यामुळे त्याच्या अंतर्मनातील वेदना समजू लागली की ती वाचकांचा कब्जा घेते आणि औदासिन्याने भारून टाकते.

महानोरांचे कथानिवेदन सरळ आणि थेट आहे. थेटपणामुळे कथेचे सुलभीकरण मात्र होत नाही. कथा प्रतिमा आणि रुपकातून व्यक्त होण्यापेक्षा विविध घटनांमधून उलगडत जाते. थोड्या सैल, मोकळ्या बांधणीमुळे आणि प्रांजळपणामुळे ती अंतःकरणाला भिडते. कथेला टोक वगैरे काढण्याच्या भानगडीत महानोर पडलेले नाहीत. त्यांनी जीवनानुभवातील कथावस्तू नीटपणे रचिवलेली असल्याने तिचे सहजपणे, अनंलकृत कथन ते करीत जातात. कथा सांगण्याचा सोस इथे जाणवत नाही. गुंत्यातून धाग्याचे टोक नेमकेपणाने पकडून अलगद गुंता सोडत जावा तशी ही कथा अवतरते. मानसिक आणि व्यावहारिक गुंत्यात अडकलेली माणसे महानोर आपल्या कथांमधून उभी करतात. 'झटापट' ही कथा फक्त दोन माणसांच्या परस्पर संवादातून आकार घेत जाते. केवळ संवाद या कथेत असले तरी त्यात फक्त नाट्यप्रकृती जाणवत नाही, तर त्यापलीकडील भावनिक विश्व लक्षात येते. बोलण्याच्या ओघात सोमनाथ आणि कौतिक एकमेकांच्या सुखदुःखाशी रममाण होतात. पाऊसपाणी, शेतीवाडी, दुष्काळ, बँकेचे कर्ज, भडकलेली महागाई आणि कष्टातून उभे केलेले केळींचे हिरवे मळे यासंबंधीचे एक चित्र 'झटापट' कथेच्या पूर्वार्धात दिसते. उत्तरार्धाचा भाग उत्कर्षाच्या जवळ जाणारा आहे. मात्र त्यामध्ये संवादापेक्षा वर्णनाचा वापर लेखकाने केलेला आहे. कथेच्या शेवटी शिकाऱ्यांच्या दांडगाईमुळे पाईपलाईन उद्ध्वस्त होते आणि कष्टाच्या डोंगरातून आता काळोख उभा राहील या भयावह जाणिवेमुळे सोमनाथला भोवळ येते. सर्वसामान्यांच्या जीवनात नियतीचे काही संकेत असतात. या संकेताने त्यांचे जीवन व्यापलेले असते. नशीब, तकदीर, दैव, प्रारब्ध अशा शब्दांनी हे संकेत व्यक्त होतात. आयुष्यातील अनपेक्षित घटनांबाबत बऱ्याचदा नियतीचा संदर्भ जोडला जातो. हा संदर्भ गैरलागू असला तरी मानवी जीवनाची चंचलता त्यातून प्रकट झाल्याशिवाय राहत नाही. महानोरांच्या कथेतील माणसे अशा नियतीच्या फटकाऱ्याने हबकून गेलेली दिसतात. त्यातून त्यांचे परावलंबित्व जसे दिसते तसे दुःखाला मोकळी वाट करून देण्याचे तंत्रही लक्षात येते. आयुष्यभर राबणाऱ्या हातांना कधीतरी दिलासा मिळायला हवा ही स्वाभाविक भावना या माणसांच्या उरी जोपासलेली आहे. परंतु हा दिलासा मिळत नाही. उलट आपण फसविले गेलो. नागविले गेलो, उद्ध्वस्त झालो अशी रुखरुख वाढीस लागते.

'दौरामौजे' या कथेतील कलेक्टर प्रामाणिकपणे कर्तव्य पार पाडताना इच्छा असूनही खात्यांतर्गत भ्रष्टाचार निपटू शकत नाही. त्यामुळे सामान्य माणसाला न्याय मिळण्यासाठी उशीर होतो किंवा न्याय मिळतही नाही. सर्वसामान्यांच्या हितासाठी झगडणाचा आव आणणारे राज्यकर्ते, निष्कलंक आणि जबाबदारी मानणारे हवे असतात. वरिष्ठ अधिकाऱ्यांसाठी कारवाई करून जेरबंद केलेले कार्यकर्ते मंत्र्याच्या दबावामुळे सुटतात. मंत्र्यांना, लोकप्रतिनिधींना त्यांचे राजकीय साटेलोटे सांभाळायचे असतात. अधिकाऱ्यांनी प्रामाणिकपणे काम केले तरी त्यांची फलश्रुती दिसत नाही. परिणामतः सामान्य माणसांची सर्वच पातळीवर हेळसांड होते. स्वातंत्र्योत्तर

काळातील भाऊबंदकीने पोखरलेली लोकशाही राज्यव्यवस्था आणि अडेलतट्टू नोकरशाहीने काढलेले तिचे धिंडवडे पाहिले की शेतमजुरांच्या, कष्टकऱ्यांच्या मरणयातनांना इथे कोणीही वाली नाही हे भगभगीत वास्तव मन काळवंडून टाकते. अशा वातावरणात आपल्या तत्त्वांना जोपासणारा सोपानराव हास्यास्पद ठरतो (खिरापत) पुरोगामी जमीन सुधारणा कायद्याची अंमलबजावणी करताना शेतकऱ्यांच्या आयुष्याचे मातेरे केले जाते. तलाठी, पोलीस पाटील, तहसीलदार, कारकून हे रॅकेट खेळी करून शेतकरी - शेतमजूरांच्या गळ्याला फास लावतात. समाजहितापोटी घेतला गेलेला मंत्रीमंडळाचा निर्णय शासकीय कर्मचाऱ्यांकडून स्वार्थासाठी राबविला जातो. पोलीस यंत्रणा आणि राजकीय लागेबांधे एकत्र आल्यावर शोषणाची धार अधिक तीव्र होत जाते (काळापोळा) सामान्यांच्या संरक्षणासाठी असलेल्या अधिकारी-कर्मचाऱ्यांनीच संगनमत करून जनजीवन गढूळ करून टाकले आहे याची जाणीव मनाला विषण्ण करणारी आहे.

ग्रामीणजीवनातील स्त्रियांचे विविध स्तरावरील मानसिक, शारीरिक शोषण महानोर तन्मयतेने रेखाटतात. या तन्मयतेत अपेक्षित असलेली तटस्थता त्यांनी सांभाळल्यामुळे कथेतील व्यक्तिरेखांचा वावर कळसूत्री बाहुल्यांसारखा राहत नाही. आपल्या बऱ्या-वाईट स्वभावछटा घेऊनच या व्यक्ती कथानकाशी एकजीव होतात. नव्याने नांदायला आलेली राधा थोरल्या जाऊचा हडेलहप्पीपणा पाहून चक्रावून जाते. आपल्या दादल्याशी संसारात रममाण होते न होते तोच तिचा नवरा अकस्मात सर्पदंशाने दगावतो (अवदसा) आयुष्यातील गोजिरवाण्या स्वप्नांचा एका तडाख्यात चक्काचूर होतो. या परिस्थितीत थोरल्या दीराने कर्तव्यबुध्दीने पाठराखण केल्यामुळे थोरली जाऊ नको तो बभ्रा करते आणि राधेचे आयुष्य होरपळून निघते. पती-वियोगाने दुःख आणि जवळच्या बाईने मांडलेला उभा दावा, यामुळे राधा कोलमडून पडते. नवऱ्याला सर्पदंश झाला त्या रात्री आपण त्याची इच्छा पूर्ण केली नाही, त्याने अनेकदा आग्रह केलातरी आपण त्याला मुळीच प्रतिसाद दिला नाही हे शल्य मात्र तिच्या मनात रुतून बसते. असे व्हायला नको होते, अशी वारंवार टोचणी लागल्यामुळे ती सैरभैर होते. तिच्या आयुष्याची अखेर अपघाताने होते आणि वाचकांच्या मनात कालवाकालव निर्माण करून जाते. बदललेल्या परिस्थितीत कुटुंबातील नातेसंबंध अतर्क्यपणे बदलत जातात आणि अंतिमतः दुःखाचा वाटेकरी ठरलेली व्यक्ती एकटी उरते, या दाहक वास्तवाचे प्रकटीकरण महानोर परिणामकारक-तेने करतात.

स्त्री-पुरुष संबंध, शेतीतील समस्या, दुष्काळाची भीषणता, महसूलखात्यातची पिळवणूक, मानवी नात्यातील फोलपणा, मैत्रीतील मूल्यभाव, निसर्गाचे बहरलेपणा आणि माणसाचे खुरटलेपण अशा वेगवेगळ्या विषयांचा स्पर्श करीत महानोरांची कथा उलगडत जाते. 'गावातल्या गोष्टी' तील कथात्मता अभिनव आहे. या गोष्टींमध्ये महानोरांमधील हळवा, रोमँटिकम कवी दिसत नाही. त्यांच्या कवितेतील पानांची सळसळ, मनातील काहूर इथे वेगळे आणि विलक्षण रूप

धारण करते. माणसाच्या मनातील गूढतेचा, अनाकलनीयतेचा आणि चमत्कारिक तार्किकतेचा शोध घेण्याचा लेखकाचा प्रयत्न लक्षवेधी आहे. कथेचा फॉर्म स्वत:च्या पद्धतीने, आशयसंगत शैलीने आविष्कृत करणारी हातोटी आणि क्षमता चाकोरीवद्ध स्वरूपाची नाही. कथेतील नाट्याची मांडणी करताना पूर्व-संदर्भाची पेरणी आशयाची वीण घट्ट करीत जाते. उत्कर्षविंदूकडे कथेचा ओघ टप्प्या-टप्प्याने झेपावतो. निवेदनातील वोलीभाषा माणसांतील स्वाभाविकतेचा प्रत्यय देते. खानदेशी वोलीचा वापर कथेला जिवंतपणा आणि चैतन्य देतो. महानोरांच्या कथेतील माणसे आपल्या अंगभूत सामर्थ्यानिशी आणि मर्यादेसह सहजतेने वावरतात. वोलीतून प्रकटणारा त्यांचा संवाद व्यक्तिमत्त्वाचा एक भाग म्हणूनच अवतरतो. छोटी वाक्यरचना, अचूक शब्दयोजना वापरून महानोर मनात हिंदकळणाऱ्या कथेचे नीटस चित्र कागदावर रेखाटतात. गद्यलेखनातील त्यांची ही वैशिष्ट्ये खास महानोरी वळणाची आहेत आणि म्हणून ती नोंद घेण्यासारखी आहेत.

❑❑

**डॉ. मनोहर जाधव**
मराठी विभाग, पुणे विद्यापीठ पुणे ७. दूरध्वनी : ०२०-६६८९४९४ (निवास)

**म. सा. पत्रिकेतील आवाहनाप्रमाणे खालील सभासदांनी देणग्या दिल्या आहेत. त्यांना मन:पूर्वक धन्यवाद !**

| | रुपये | | रुपये |
|---|---|---|---|
| पटवर्धन दिनकर माधव, पुणे. | ४००/- | भट सुधा वासुदेव, पुणे. | ३००/- |
| वझे राम भालचंद्र, पुणे. | ३००/- | गुजर भालचंद्र, धुळे. | ३००/- |
| गोडवोले मुकुंद कृष्णाजी, | ४००/- | महंत गोपीनाथ शास्त्री, रिद्धपूर | ३००/- |
| गोडवोले मुकुंद कृष्णाजी | १००१/- | परांजपे विनायक पांडुरंग, पुणे | २५०/- |
| पाटील शामराव ज्ञानदेव, इस्लामपूर | ३००/- | टोपले लक्ष्मण ढवळू, ठाणे | ३००/- |
| पुजारी श्रीराम, सोलापूर, | ५०१/- | कुलकर्णी नरसिंह शेषाद्री, पुणे. | २५००/- |
| लेले अरविंद, पुणे. | ३०१/- | महाजन विनायक लक्ष्मण, निगडी. | १०१/- |
| घारे पां. श्री. पुणे. | ४५०/- | अहिरे दत्तुसिंग जनार्दन, पुणे. | १००/- |
| केळकर अशोक रा. पुणे | ५००/- | सरदेसाई अंजली, मुंबई. | ३१०/- |
| बेरी गजानन वामन, पुणे. | ३००/- | जोशी गणेश लक्ष्मण, वरची खोपाली | ३००/- |
| कुलकर्णी पां. ना. कोल्हापूर | ३००/- | कानेटकर मधुसुदन शंकर, पुणे | ३००/- |
| भावे ललिता, पुणे. | ३००/- | देशपांडे रा. व्यं. पुणे. | ४००/- |
| ओरपे द. दा. पुणे. | ३००/- | पेठे मो. व्यं. मुंबई. | ४००/- |
| भट रवींद्र, पुणे. | ३००/- | केतकर सीमंतिनी, कल्याण. | ३००/- |
| ठाकूरदेसाई श्रीकृष्ण हरि, पुणे. | ३००/- | काकडे सतीश वसंतराव, बारामती | २००/- |










# कै. य. गो. जोशी यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने



डॉ. प्र. चिं. शेजवलकर

**योगायोग :**

आयुष्यात प्राप्त होणारे अनेक योगायोग चिरकाल सुखद ठरतात. यातून कायमचे ऋणानुबंध निर्माण होतात. सुप्रसिद्ध साहित्यिक कै.य.गो.जोशी यांची माझा बेचाळीस वर्षांपूर्वी, म्हणजे जानेवारी १९५९ मधे जी त्यांच्या निवासस्थानी भेट झाली त्यामधून पुढे मी कायमचा 'प्रसाद' परिवारातील एक अविभाज्य घटक होणार आहे आणि त्यातून मला अखंड लेखन करण्याचा योग प्राप्त होणार आहे ही त्यावेळी कल्पना नव्हती. त्याचे असे झाले, मी विद्यार्थी म्हणून शिकत असताना मी पाहिलेला 'वहिनींच्या बांगड्या' हा चित्रपट ाझ्या अंत:करणाला जाऊन भिडला. ाझी थोरली वहिनी हीदेखील अशीच ाझ्यावर खूप प्रेम करीत होती. हा कुटुंब-त्सल चित्रपट सर्वच मराठी समाजाला आवडला. पुढे मी पुण्याच्या वृहन महाराष्ट्र कॉलेज ऑफ कॉमर्स या महाविद्यालयात व्याख्याता म्हणून नोकरीला लागलो तेव्हा माझ्या एका वर्गातील मला अतिशय आवडलेली चार-पाच मुले मला नेहमी भेटत असत. त्यांचा मला लळा लागला होता.




सर्वच चारही मुले सात्त्विक वृत्तीची होती. 'वहिनींच्या बांगड्या' या चित्रपटाचे मूळ लेखक श्री.य.गो.जोशी हे त्या विद्यार्थ्यांपैकी एकाचे वडील आहेत हे कळल्यामुळे य.गो.जोशी या थोर लेखकाला त्यांच्या घरी जाऊन भेटावे असे माझ्या मनात आले आणि त्यांचा मुलगा मनोहर म्हणजेच आताचे 'बापूसाहेब जोशी' याने ती भेट घडवून आणली. पहिल्याच भेटीत य.गो.जोशी मला खूप आवडले. त्यांना उद्देशून मी भाऊसाहेब असे म्हणालो तेव्हा ते म्हणाले की मला भाऊ या नावानेच हाक मारलेली आवडेल. त्याच भेटीत त्यांनी मला 'प्रसाद' साठी दर महिन्याला एक सदर लिहिण्याचे सुचविले. ते मी लिहिण्यास सुरुवात केली आणि त्यांच्या प्रोत्साहनामुळे मी पुढे सतत लिहीत गेलो. त्यांचे व्यक्तिमत्त्व अतिशय प्रसन्न होते. ते बोलकेही होते आणि इतरांना

वोलके करीत. येणाऱ्यांचे मनापासून अगत्य करीत. त्यांच्याकडे जाऊन त्यांचे वोलणे ऐकत रहावे असे वाटे. 'प्रसाद' मासिकावरोवरच त्यांनी एरव्ही एखाद्या प्रकाशनाला शक्य झाले नसते असे विविधि ग्रंथांचे प्रकाशन केले. गेल्या अनेक वर्षांत अनेक मराठी नियतकालिके धडाधड वंद पडली. परंतु यगोंची पुण्याई इतकी मोठी की 'प्रसाद' हे नियतकालिक आज संपूर्ण महाराष्ट्रात शेकडो ठिकाणी नियमितपणे जाऊन पोहोचत आहे. याचे श्रेय त्यांचे चिरंजीव श्री.वापूसाहेव जोशी यांनाच आहे. 'प्रसाद' प्रकाशनाला त्यांनी कायमचे वाहून घेतले आहे.

सुप्रसिद्ध साहित्यिक कै.य.गो.जोशी यांच्या जन्मशताब्दीचे हे वर्ष आहे. आपल्यातून जाऊन त्यांना सदतीस वर्षे झाली आहेत. म्हणजे खरे तर वराच काळ लोटलेला आहे. पण काही व्यक्तिमत्त्वे अशी असतात की, ती जरी आपल्यातून प्रत्यक्षात गेली तरी त्यांच्या कार्याने ती चिरंजीवच असतात. एक उत्कृष्ट प्रकाशक, 'प्रसाद' सारख्या धार्मिक व अध्यात्मिक मासिकाचे यशस्वी संपादक, उत्तम कौटुंविक संस्कारक्षम लघुकथा लेखक प्रत्यक्षात तसेच सात्विक जीवन जगणारे असे ते वहुआयामी व्यक्तिमत्त्व होते. त्यांचा माझा परिचय माझ्या भाग्यानेच झाला. त्यांच्या सांगण्यावरूनच मी त्यांच्या मासिकातील 'सिंहावलोकन' हे सदर लिहिण्यास सुरुवात केली. ते सदर नंतर इतके लोकप्रिय झाले की, मी आजतागायत गेली वेचाळीस वर्षे अखंडपणे ते लिहीत आहे. त्यांचे चिरंजीव श्री. मनोहर उर्फ वापूसाहेव जोशी हे वाणिज्य महाविद्यालयातील माझे विद्यार्थी, वडिलांच्या नंतर त्यांनीच 'प्रसाद' हे मासिक त्याच धडाडीने पुढे चालू ठेवले. अर्थातच नंतरच्या पिढीतही त्यामुळे माझा त्यांचा संवंध वाढला व मी त्यांचा लेखक व पितृतुल्य हितचिंतक वनलो.



'य.गो.जोशी' - आम्ही त्यांना भाऊ म्हणत असू. त्यांनी केलेले योगदान कशाकरता होते ? कोणत्या कल्पनेने त्यांनी हे सर्व काम उभे केले हे ते वोलून दाखवित असत. त्यांची ही भूमिका माहीत असल्यामुळे वापूसाहेवांनी हा वारसा कसा सांभाळला हे मला नेहमीच पडताळून पहाता आले. आज भाऊंच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने या सर्व कार्याचा आलेख मांडण्याचा माझा विचार आहे.

'प्रसाद' मासिक सुरू करताना वारकरी संप्रदायाचे अध्वर्यू व विसाव्या शतकातील थोर संत प्राचार्य शं.वा.उर्फ सोनोपंत दांडेकर यांचे सहकार्य त्यांना लाभले. आपले नाव भाऊंच्या सतत चालणाऱ्या संस्कार - प्रभावी कामात जोडून देण्यास मामा दांडेकरांनी संमती देणे हीच खरी म्हणजे भाऊंच्या कामाची यथोचित पावती आहे, आणि आता मला आठवते की, भाऊंच्या निधनानंतर मामा भाऊंच्या मुलाला भेटण्यासाठी त्यांच्या घरी आले व म्हणाले, 'माझ्या जोडीला तुझे नाव प्रसादवर संपादक म्हणून घेऊ आणि भाऊंचे काम आपण तसेच पुढे चालवू.' यातही मामा दांडेकरांचा मनाचा मोठेपणा भाऊंच्या कामाबद्दलची अस्था व बापूसाहेबांबद्दलचा विश्वास दिसून येतो असे मला नेहमीच वाटत आले.

**'प्रसाद' मासिक :**

'प्रसाद' मासिक लवकरच महाराष्ट्रात अतिशय लोकप्रिय झाले. प्रत्येक सुसंस्कृत घरात 'प्रसाद' पोहोचला व हा प्रसादचा वाचकवर्ग आजही तसाच आहे. तीन-तीन पिढ्या प्रसादचे सभासद असलेली कित्येक घरे आहेत. मला स्वतःला याचा नेहमीच सुखद अनुभव येतो. कामानिमित्ताने छोट्या, मोठ्या अनेक गावांतून जातो. प्रसादचा वाचक मला सगळीकडे नेहमीच भेटत असतो. या भेटणाऱ्या माणसांच्या वागण्याबोलण्यातून 'प्रसाद' बद्दलचा जिव्हाळा प्रतीत होत असतो. वास्तविक मी व्यवस्थापन शास्त्राचा विद्यार्थी पण आमच्या कित्येक चर्चासत्रातून, समारंभातून माझी ओळख करून देताना प्रसादचे लेखक अशी करून दिली जाते. हीच ओळख सगळ्यांना जवळची वाटते व मलाही हीच ओळख जास्त भावते.

'प्रसाद' मधून भाऊंनी अनेक उत्तमोत्तम लेखमाला प्रसिद्ध केल्या. अनेक लेखकांना लिहिते केले. अनेक नवोदितांना संधी दिली. पुढे मराठी साहित्यात मानाचे स्थान मिळविणाऱ्या अनेक लेखकांचे साहित्य सुरुवातीला प्रसादनेच प्रसिद्ध केले. रणजित देसाई, व.पु.काळे अशी कितीतरी नावे घेता येतील. पंडित महादेवशास्त्री जोशी, के.वि.बेलसरे, बाबासाहेब खापर्डे अशा अनेकांकडून अनेक लेखमाला लिहून घेतल्या. मामा दांडेकर यांची कीर्तने ऐकण्यासाठी प्रचंड समाज जमत असे. पण आज त्यांच्यानंतर त्यांचे वाङ्मयधन आपल्याला प्रसादमुळेच किंबहुना भाऊंच्या दूरदृष्टीमुळेच उपलब्ध झाले आहे.

'अभंग-संकीर्तन', 'प्रवचने', 'अध्यात्मशास्त्राची मूलतत्त्वे' हे सर्व सुरुवातीला 'प्रसाद' मधून लेखरूपाने व नंतर ग्रंथरूपाने प्रसादनेच आपल्याला दिले आहे. भाऊंनीच वै.सोनोपंत दांडेकरांकडून 'सार्थ ज्ञानेश्वरी' लिहून घेतली. हे त्या दोघांचे मराठी समाजावरचे ऋण कधीच फिटणार नाही. स.आ.जोगळेकर हेही भाऊंचे प्रसादचे सहकारी. 'सह्याद्रि' व गाथा सप्तशती' हे महाराष्ट्र साहित्याला ललामभूत असलेले ग्रंथ भाऊंनी स.आ.जोगळेकरांकडून लिहून घेतले. 'रामायण', 'महाभारत' 'श्रीकृष्ण चरित्र' हे प्रसादचे विशेषांक त्या काळात अतिशय लोकप्रिय ठरले.

'संदर्भ ग्रंथ' व 'कोश वाङ्मय' प्रकाशन हा भाऊंच्या कार्याचा आणखी एक वेगळाच पैलू

आहे. 'सुलभ विश्वकोश','वाक् संप्रदाय कोश','महाराष्ट्र शब्दकोश' अशा सारख्या अतिशय अवघड कामांवर कळस चढवला तो प्रिं.वा.शि.आपटे यांच्या 'संस्कृत-इंग्रजी' कोशाच्या नव्या आवृत्तीने. त्या कामाची नुसती कल्पना करणेही अशक्य आहे अशी त्या काळातच काय पण आजही अशक्यप्राय वाटणारी प्रचंड प्रकाशने भाऊंनी सहजतेने केली. संस्कृत-इंग्रजी कोशाच्या प्रकाशनासाठी त्या वेळचे भारताचे ऋपितुल्य राष्ट्रपती डॉ. राजेंद्रप्रसाद मुद्दाम भाऊंच्या घरी कार्यक्रमासाठी आले होते. त्या सोहळ्याचा मी एक साक्षीदार आहे.

भाऊंच्या वाङ्मयाचे मूल्यमापन करणे हे माझे क्षेत्रच नव्हते पण माझ्या लहानपणीही 'वहिनींच्या बांगड्या', 'शेवग्याच्या शेंगा','दुधावरची साय' अशा य.गो.जोशी यांच्या कित्येक कथा किती लोकप्रिय झाल्या होत्या हे मला चांगले आठवते. या कथांवरील मराठी व हिंदी चित्रपटही असेच लोकप्रिय झाले. एकत्र कुटुंब पद्धतीचा पुरस्कार भाऊंनी आपल्या लेखनातून सतत केलाच. पण कौटुंबिक नात्यातील जिव्हाळा हा त्यांना सगळ्यात जास्त मोलाचा वाटत असे. या नात्यातील जिव्हाळ्याचे अनेक पदर त्यांनी आपल्या अनेक कथांतून उलगडून दाखवले. किंबहुना हा जिव्हाळा हाच सर्व सुखाचा आधार आहे. असे प्रतिपादन त्यांनी नेहमीच केले. सर्व सामान्य वाचकाच्या काळजाला जाऊन भिडणारे हे वाङ्मय त्यामुळेच सदा हरित व चिरंतन ठरले. 'दुधाची घागर' हा आईच्या महन्मंगल प्रेमाचा अमृत कलश मराठी वाङमयात अजरामर झाला. भारतीय संस्कृतीचा ठेवा जपणे आणि ज्ञानेश्वरीसारखा मराठीचा सांस्कृतिक वारसा सर्वसामान्यांना उपलब्ध करून देणे हे भाऊंच्या सर्व कामाचे सूत्र होते. मात्र ते करताना स्वतःकडे मोठेपणा न घेता माऊलीच्या शब्दात सांगायचे तर 'जगा धाकुटे होईजे' अशीच त्यांची नेहमी भूमिका असे. पंढरीच्या पांडुरंगाच्या दर्शनाला जाताना नामदेवाची पायरी लागते. मूळ ज्ञानेश्वरीचा अभ्यास करताना ही 'यशवंताची पायरी ठरो' ही सुबोध ज्ञानेश्वरीतील अर्पणपत्रिका भाऊंच्या या भूमिकेचीच साक्ष आहे.

**भाऊंच्या नंतर :**

७ नोव्हेंबर १९६३ रोजी भाऊंचे अचानक निधन झाले. त्यांचे चिरंजीव मनोहर जोशी म्हणजेच बापूसाहेब हे एवढा मोठा भार पेलण्याच्या दृष्टीने वयाने तसे लहानच होते. त्यामुळे प्रसादच्या ह्या कार्याचे पुढे काय होणार अशी आम्हा सर्व निकटवर्तीयांना चिंता वाटत होती. पण भाऊंची ज्ञानेश्वर माऊलीवर, गोंदवलेकर महाराजांवर नितांत श्रद्धा होती. त्यांच्या आशीर्वादानेच मी हे काम करतो. असे ते नेहमीच म्हणत असत. तेच आशीर्वाद व भाऊंची पुण्याई या जोरावर प्रसादचा व्याप बापूसाहेबांनी सांभाळायला सुरुवात केली. प्रसादचे हजारो हितचिंतक त्यांच्या पाठीशी होतेच. हे झाड वठणार की काय असे वाटत असतानाच वृक्षाला नवी पालवी फुटावी एवढेच नव्हे तर फळाफुलांनी तो वृक्ष बहरून यावा असे झाले. भाऊंचे कार्य पुढे जीवनव्रत म्हणूनच चालवायचे अशा निष्ठेनेच त्यांनी कामाला सुरुवात केली. अनेक नव्या कल्पना अमलात



अनुक्रमणिका

आणल्या अनेक नवी माणसे, नवे लेखक जोडले व प्रसादचे कार्य पूर्वीच्याच उत्साहाने सुरू झाले.

महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनात प्रसादचे स्थान आजही मोलाचे आहे. प्रसादचा दर वर्षीचा वर्षारंभ विशेषांक हा दैवत विशेषांक म्हणून प्रसिद्ध होऊ लागला. गणेश, दत्त, शिव, देवी, हनुमान, राम अशा अनेक दैवतांवर अंक प्रसिद्ध झाले. माझा लेख प्रत्येक अंकात असतोच. विषयाच्या अनुरोधाने माझ्याकडूनही प्रसादमुळे खूप वेगळ्या विषयावर लिहिले गेले. दैवत अंक हे त्या त्या दैवताच्या भक्ताला प्रसादने दिलेली अनमोल भेट आहे. त्यामुळे त्या दैवतांकांना उदंड लोकप्रियता लाभली.

वाचकाला जे आवडते तेच फक्त प्रसिद्ध करण्याऐवजी वाचकांनी जे चांगले वाचावे असे मला वाटते तेच मी प्रसिद्ध करतो असे भाऊ नेहमी म्हणत. हीच परंपरा 'प्रसाद'ने पुढे चालू ठेवली आहे. याच्याही पुढे जाऊन भारतीय संस्कृति हाच केंद्रबिंदू धरून काम करायचे असे प्रसादने ठरवले व वाचकाकडून या कल्पनेला खूपच चांगला पाठिंबा मिळाला. मला आठवतो तो 'प्रसाद'चा रौप्यमहोत्सवी समारंभ ! गोव्याचे तेव्हाचे लोकप्रिय मंत्री दयानंद बांदोडकर हे त्या कार्यक्रमासाठी मुख्य पाहुणे म्हणून आले होते. मी प्रसादचा नियमित वाचक आहे व त्या प्रेमानेच मी या कार्यक्रमासाठी आलो आहे असे त्यांनी आपल्या भाषणात सांगितले तेव्हा सर्वांनाच आश्चर्याचा सुखद धक्का बसला. श्री.बांदोडकर, मा.यशवंतराव चव्हाण, कै.व्यंकटराव हिरे यांच्या सारखे अनेक राजकारणी, भालबा केळकर, धुमाळ यांच्यासारखे नाट्य व सिनेव्यावसायिक अशा वेगवेगळ्या क्षेत्रातील अनेक माणसे प्रसादची वाचक आहेत. सर्वसामान्य वारकऱ्यापासून मोठमोठे व्यावसायिक, कारखानदार, राजकारणी अशा अनेक थरात प्रसाद नित्य वाचला जातो. हे पाहिले की समाजाचे सांस्कृतिक मन अजूनही जागे आहे व त्याला चांगल्याची आवड आहे हे पाहून 'उद्या' च्या समाजाची वाटणारी चिंता आपोआपच कमी होते. प्रसादचे आणखी एक वैशिष्ट्य मला आढळले. गावोगाव पसरलेल्या प्रसादचा वाचक आवर्जून प्रसादच्या कचेरीमध्ये बापूसाहेबांना भेटायला येतो. मी ज्या ज्या वेळी बापूसाहेबांना भेटायला त्यांच्या ऑफिसमध्ये जातो, त्या त्या वेळी अनेक गावचे आणि अनेक स्तरांतले असे वाचक मला तिथे भेटतात.

नुकताच प्रसादचा सुवर्ण महोत्सव मोठ्या थाटात साजरा झाला. पुण्याच्या टिळक स्मारक मंदिरात समर्थभक्त प.पू.अण्णाबुवा कालगावकर, नानाजी देशमुख, प्र.न.जोशी, प्राचार्य राम शेवाळकर अशी अनेक नामवंत मंडळी उपस्थित होती. कार्यक्रमासाठी पडदा उघडला आणि तेथे जमलेला प्रचंड श्रोतृवर्ग पाहून आम्हा सर्वांचेच डोळे निवले, सर्व आसने भरलेली होतीच पण उभे राहायला जेथे जेथे जागा मिळेल तेथे माणसे दाटीने उभी होती. एका प्रकाशन संस्थेच्या कार्यक्रमासाठी एवढ्या प्रचंड संख्येने वाचक उपस्थित राहतात याचे मलासुद्धा खरोखर आश्चर्य वाटत होते. आज जर भाऊ असते तर त्यांना हा मेळावा पाहून नक्कीच कृतकृत्य वाटले असते



अनुक्रमणिका

असा विचार माझ्या मनात येऊन गेला. हाच विचार प्राचार्य राम शेवाळकरांनी बोलूनही दाखविला.

'प्रसाद' हे एक मोठे कुटुंब आहे असे बापूसाहेब नेहमी म्हणतात. खरोखर त्या दिवशी 'प्रसाद' परिवाराचे कौटुंबिक संमेलनच साजरे झाले.

भारतीय संस्कृतीचा अनमोल ठेवा घरोघरी पोचला पाहिजे असे भाऊ नेहमी म्हणत असत. या त्यांच्या विचारांचे बीज बापूसाहेबांच्या मनात रुजले होते. त्यातूनच आपले वेद, आपली उपनिषदे, आपली पुराणे या योजनेचा जन्म झाला व वटवृक्षाप्रमाणे हे काम विस्तार पावले. संस्कृतमध्ये असलेला ज्ञानाचा ठेवा संस्कृत समजू शकत नसलेल्या आजच्या व पुढच्या पिढ्यांना सोप्या मराठीत उपलब्ध करून द्यावा. या विचाराने चार वेद, दहा उपनिषदे, तीस पुराणे हे प्रचंड वाङ्मय मराठीत आणण्याचे प्रसादने ठरवले. हे काम उत्तम होतेच पण, 'ठेव योजनेत ग्रंथ' ही कल्पना अफाट लोकप्रिय ठरली व मराठीत वाचकांच्या प्रतिसादाचा एक अभूतपूर्व विक्रमच प्रसादने केला. आजपर्यंत कधीही, कोणत्याही योजनेला मिळाला नसेल असा अभूतपूर्व प्रतिसाद या योजनेला मिळाला. महाराष्ट्राच्या सर्व भागातून उत्तम प्रतिसाद असल्याने दरवर्षी प्रसिद्ध होणारे योजनेतील संच निरनिराळ्या गावी मोठ्या थाटात प्रकाशित करण्यात आले. नाशिक, नागपूर, पणजी, पुणे अशा अनेक गावी हे समारंभ झाले व या समारंभातही एवढी प्रचंड उपस्थिती असायची की, पुढे पुढे हे समारंभ एखाद्या सभागृहाऐवजी मोकळ्या मैदानातच करावे लागले.

प्रसादने समाजाला भरपूर दिले आहे, देत आहे. समाजही या सगळ्या कामाला भरभरून प्रतिसाद देत आहे.

आद्य शंकराचार्यांचे समग्र वाङमय आजपर्यंत मराठीत आणले गेले नव्हते. 'सुबोध शंकर ग्रंथावली' या योजनेतून प्रसादने हा उपक्रम पूर्ण करीत आणला आहे. कालिदास, भवभूति, भास यांचे अजरामर संस्कृत ललित साहित्य मराठीत आणण्याचा उपक्रमही 'देवभाषेचे देणे, मराठीचे लेणे' या योजनेतून प्रसाद ने पूर्ण करीत आणला आहे. आजच्या महागाईच्या दिवसांत आर्थिकदृष्ट्या प्रचंड असलेली ही कामे कल्पनेत आणणेही किती अवघड आहे हे अर्थशास्त्रातल्या माझ्यासारख्या माणसाला नेहमीच वाटते. मग ही कामे स्वत: अंगावर घेऊन पूर्ण करणे आर्थिकदृष्ट्या किती कठीण आहे याची कल्पनाच केलेली बरी ! पण भाऊंनीच एकदा म्हटलेले मला आठवते, 'मोठ्या कामांना मोठेच भांडवल लागते,पण भांडवलावाचून मोठी कामे कधीच अडून रहात नाहीत' या त्यांच्या म्हणण्याचे प्रत्यंतर मला नेहमीच येत असते. डोक्यावर देवाचा आशीर्वाद आणि पाठीवर समाजपुरुषांच्या कौतुकाची थाप असल्याशिवाय अशी कामे तडीला जाणे कठीण आहे. म्हणूनच व्यावसायिकदृष्ट्या अशक्य असलेली ही कामे प्रसादने सहजतेने पार पाडली आहेत.

आता प्रसादने असाच एक प्रचंड उपक्रम हाती घेतला आहे. समर्थ रामदासांचे समग्र वाङमय अर्थासह सोप्या मराठीत पहिल्यांदाच प्रकाशित होणार आहे. समर्थांच्या लेखनातला भावार्थ किंवा गूढार्थ समर्थांच्या वाङमयाच्या चिंतनात व अभ्यासात ज्यांनी आयुष्य घातलेले आहे. अशा अनेकांकडून हे लेखन होणार आहे. प्रसादचे आणखी एक वैशिष्ठ्य म्हणजे अशा सर्व जगावेगळ्या कामांसाठी जोडलेली गुणी माणसे. किंबहुना आता उलट असे म्हटले पाहिजे की, कोणताही चांगला माणूस हा प्रसादच्या परिवारात असतोच ! लेखक म्हणून, वाचक म्हणून, सभासद म्हणून हितचिंतक म्हणून ! म्हणूनच निरनिराळ्या क्षेत्रातल्या अशा अनेक माणसांचा रावता प्रसादच्या ऑफिसमध्ये असतो.

आता तर प्रसादची तिसरी पिढीही कार्यरत झालेली आहे. बापूसाहेबांची कन्या चि.सौ.उमा बोडस ही मासिकाचा व्याप सांभाळत आहे. माझा आनंदाचा भाग असा की तीही माझीच विद्यार्थीनी आहे. माझ्याच हाताखाली, माझ्याच संस्थेत तिने व्यवस्थापनाची पदवी घेतली आहे. सुसंस्कार करण्याचे प्रसादचे काम पुढेही चालू राहणार आहे ही जाणीव प्रसादच्या संस्थापकांच्या जन्मशताब्दीच्या वर्षात होणे ही गोष्ट मराठी मनाला दिलासा देणारी आहे.

❑ ❑

**डॉ. प्र. चिं. शेजवलकर**
१०८/११ भारती निवास सोसायटी,
एरंडवणा, पुणे ४११ ००४.



अनुक्रमणिका

# ग्रामीण कवितेचा इतिहास : एक अभ्यासपूर्ण आढावा



**डॉ. मंदा खांडगे**

खानदेश निवासी प्रा. कैलास सार्वेकर यांनी प्रा.डॉ.आनंद यादव यांच्या मार्गदर्शनाखाली पुणे विद्यापीठात पीएच.डी.साठी मराठी ग्रामीण कवितेच्या इतिहासाचा मागोवा घेऊन प्रबंध सादर केला. त्यांना पीएच.डी. पदवी प्राप्त झाली. प्रा. सार्वेकर यांनी ग्रंथलेखनासाठी आवश्यक अशी मांडणी करून आपल्या प्रबंधास 'मराठी ग्रामीण कवितेचा इतिहास' ह्या नावाने ग्रंथबद्ध केले आहे.

आधुनिक मराठी साहित्यामध्ये गेल्या पन्नास वर्षांत ग्रामीण साहित्याचा जो एक प्रवाह स्थिर झाला आहे त्यातील काव्य या वाङ्मयप्रकाराचे साकार, सोदाहरण, अभ्यासपूर्ण असे विवेचन करून एका चांगल्या संदर्भग्रंथांची भर या ग्रंथरूपाने प्रा. कैलास सार्वेकर यांनी घातली आहे. ग्रामीण साहित्याच्या अभ्यासकांना या ग्रंथाने निश्चितच मार्गदर्शन होईल.

इ.स. १८८५ ते १९९० म्हणजे जवळजवळ एका शतकातील ग्रामीण कवितेचा अभ्यासपूर्ण आढावा प्रा.सार्वेकर यांनी या ग्रंथातून घेतला आहे. या ग्रंथाची विभागणी त्यांनी चार भागात केली असून त्यातील पहिल्या भागास 'ग्रामीण कवितेची पहाट' असे शीर्षक दिले आहे. इ.स. १९२० पूर्वीच्या ग्रामीण कवितेचा ऊहापोह या प्रकरणात केला आहे. दुसऱ्या भागाला 'जानपद कवितेचा काळ' असे शीर्षक दिले असून १९२० ते १९६० या कालखंडातील ग्रामीण कविता लिहिणाऱ्या कवींच्या काव्यांचा सविस्तर आढावा घेतलेला आहे. तिसरा भाग हा साठोत्तर ग्रामीण कवितेचा असून १९६० ते १९९० या कालखंडातील आनंद यादव, ना.धों.महानोर, विठ्ठल वाघ या कवींवर स्वतंत्र प्रकरणे दिलेली आहेत. चौथ्या भागात ग्रामीण कवितेच्या समीक्षेसाठी एक प्रकरण असून शेवटचे प्रकरण उपसंहार होय. परिशिष्टाच्या दुसऱ्या भागात कविता आणि काव्यसंग्रह यांचा कालपट दिलेला आहे. परिशिष्ट तीनमध्ये संदर्भग्रंथाची सूची दिली असून परिशिट चारमध्ये संदर्भासाठी अभ्यासलेल्या लेखांची सूची आहे.

प्रा. सार्वेकर यांनी विषयाच्या अभ्यासाच्या सोयीसाठी १८८५ ते १९२०, १९२० ते १९६० आणि १९६० ते १९९० अशी या कालपटाची विभागणी केली आहे. शंभर वर्षांच्या या दीर्घ कालखंडाच्या अभ्यासासाठी हे टप्पे सोयीचे ठरले आहेत. या टप्प्यातील कवींच्या काव्याचा अभ्यास करताना एकूण ग्रामीण कवितेमधील या कवींच्या कवितेचे स्थान तसेच त्यांच्या काव्याचे सामर्थ्य आणि मर्यादा यावर प्रकाश पडतो.

'ग्रामीण कवितेची पहाट' या पहिल्या भागात प्रा.सार्वेकर यांनी १९२० पूर्वीच्या ग्रामीण कवितेच्या परामर्ष घेतला आहे. ज्या कवितेत ग्रामीण जनजीवनाचे चित्रण ग्रामीण संवेदनशीलतेने



अनुक्रमणिका

केलेले असते तिला ग्रामीण कविता म्हटले जाते. या कवितेमध्ये खेडे, खेड्याशी संलग्न असलेले कृषिजीवन, खेड्यातील जनजीवनाचे दुःख, हर्ष, दारिद्र्य, रूढी, परंपरा, संस्कृती या साऱ्यांचा समावेश होतो. अशी स्थूलमानाने व्याख्या लेखकाने केली आहे. ग्रामीण कवितेची सुरवात निश्चित कोणत्या कवीने केली हे सांगता येत नाही तथापि भा.रा.तांबे आणि चंद्रशेखर यांच्यापासून झाली असे कोणी म्हणतात. पण निश्चितपणे कुठून सुरुवात झाली हे ठरविता येत नाही असे विवेचन करून लेखकाने आधुनिक मराठी काव्याच्या प्रारंभापासूनच ग्रामीण कवितेच्या खुणा कमी अधिक प्रमाणात दिसून येतात असे ढोबळ विधान करून या कालखंडातील कवींच्या काव्याचे, सोदाहरण विचेचन केले आहे. केशवसुतांची 'एक खेडे' माधवानुजांची 'दुष्काळ' या कवितांचे या संदर्भातील गुणदोष साधार विवेचिले आहेत. ग्रामीण कवितेचे 'ज्ञानपदगीत' असे नामकरण होण्याअगोदरचे त्यांचे कार्य मोलाचे म्हणावे लागेल असे त्यांना वाटते. काव्याच्या क्षेत्रात भरीव कामगिरी करून गेलेले पण अल्पायुपी ठरलेल्या कवी पत्रांच्या दुष्काळपीडीतास आणि '१८९७ या वर्षाला' या दोन कवितांचा विचार त्यांना ग्रामीण काव्याच्या दृष्टिकोनातून महत्त्वाचा वाटतो. कवी विठ्ठल भगवंत लेंढे आणि मोरो गणेश लेंढे हे या कालखंडातील महत्त्वाचे कवी. यांनी लिहिलेल्या ग्रामीण कविता अनुक्रमे 'शेतकरी आणि हंगाम' यांचा उल्लेखही प्रा.सार्वेकर यांनी केला आहे. या कवींच्या कविता तुरळक आहेत त्यामानाने कवी चंद्रशेखर यांनी ग्रामीण जीवनावर आधारित तीन खंडकाव्ये लेहिली असून स्फूट कवितांही लिहिल्या. पैकी 'काय हो चमत्कार' हा खंडकाव्य सर्वश्रुत आहे. ज्येष्ठ समीक्षक कै.प्रा.रा.श्री.जोग यांनी 'काय हो चमत्कार' हे एक यशस्वी रुपांतराचा केवळ आदर्श आहे.' असे म्हटले आहे. या कथेतील घटना अद्भुत आणि चमत्कृतिपूर्ण आहेत. हेच या काव्याचे वैशिष्ट्य ठरले. किस्मतपूरचा जमीनदार आणि 'उघड गुपित' ही इतर दोन खंडकाव्ये. पैकी 'उघड गुपित' हे चंद्रशेखरांचे खंडकाव्य 'सुगी' या ग.ल.ठोकळ संपादित प्रातिनिधिक ज्ञानपदगीत संग्रहात प्रारंभीच आले आहे. या दोन्ही खंडकाव्यांचा थोडक्यात कथानकासह उल्लेख लेखकाने केला आहे. चंद्रशेखरांच्या इतर स्फुट कवितांवरही प्रकाश टाकला आहे. लेखक म्हणतात, 'चंद्रशेखरांची कविप्रकृती भावकाव्ये लिहिण्याची नसून कथनकाव्य लिहिण्याची होती. ग्रामीण कवितेच्या सुरवातीच्या कालखंडात चंद्रशेखरांच्या कवितेने पांढरपेशा जीवनाभोवती मर्यादित झालेल्या मराठी कवितेला ग्रामीण जीवनाचा नवा आशय देण्याचा प्रयत्न केला हे त्यांचे मोल लेखकाने मानले आहे आणि मराठी ग्रामीण कवितेत ग्रामीण बोलीचा वापर करण्याचा प्रयोग चंद्रशेखरांनीच प्रथम केला. या दृष्टीने त्यांची ग्रामीण कविताविषयक कामगिरी महत्त्वाची ठरते असे म्हटले आहे ते योग्य आहे.

हा कालखंड साधारणपणे ३०-३५ वर्षांचा आहे. त्यात भा.रा.तांबे यांच्या ग्रामीण कवितातूनही तांब्यांची सौंदर्यवादी भूमिका कायम राहिलेली दिसते आणि ग्रामीण वास्तवापासून ही कविता दूरच राहिलेली दिसते असे भा.रा. तांबे यांच्या कवितेविषयी टीका करताना म्हटले आहे. माधवानुजांसारखा एखादाच या कालखंडातील कवी विषयाच्या दृष्टीने वास्तवाच्या जवळ गेला आहे. या कालखंडातील

साऱ्याच कवींची कविता ग्रामीण वास्तवापासून दूरच राहिलेली दिसते असे प्रा. सार्वेकर यांनी या कालखंडातील कवितेच्या संदर्भात म्हटले आहे.

या ग्रंथाचा दुसरा भाग १९२० ते १९६० पर्यंतच्या जानपद कवितेचा असून यातील पहिल्या प्रकरणात सुगीतील कविता तसेच गिरिश, यशवंत यांच्या कवितेसंबंधी प्रा. सार्वेकर यांनी विचार मांडले आहेत. केवळ जानपद गीतांचा समावेश असलेला 'सुगी' हा पहिला प्रातिनिधिक संग्रह ग.ल.ठोकळ यांनी १९३३ साली संपादित केला. ग.ह.पाटील, सोपानदेव चौधरी, काव्यविहारी, वा.गो. मायदेव, भ.श्री.पंडित यांच्यासह अनेक कवींच्या ग्रामीण कविता या संग्रहात समाविष्ट झाल्या आहेत. 'ग्रामीण परिसरातील वेगवेगळ्या विषयांचं चित्रण करणाऱ्या या कविता ढोबळ वर्णनापलिकडे गेल्या नाहीत. या वर्णनातही बऱ्याच ठिकाणी तपशीलाचे घोटाळे आहेत असे लेखकाने मत नोंदवले आहे. ग.ह.पाटील, पां.श्री.गोरे अशा काही मोजक्याच कवींच्या कविता वास्तवदर्शी आहेत असे त्यांना वाटते. भाषेच्या बाबतीतही ग्रामीण आणि नागर अशा बोलींचे मिश्रण बऱ्याच कवितेत दिसते. हे निरीक्षणही नोंदवले आहे. तसे पाहिले तर ग्रामीण कवितेच्या सुरवातीच्या कालखंडातील ही कविता प्रयोगशीलच म्हणायला हवी. त्यामुळे या कवींच्या काव्यात अशा त्रुटी जाणवतात. गिरिश, यशवंत हे रविकिरण मंडळाचे प्रमुख कवी. यशवंतांच्या ग्रामीण जीवनातील कवितात कृषिजीवन जगणारे लोक आहेत. त्या स्थितीत समाधान मानणारे आहेत हा भाग जसा दिसतो आहे, तसे तपशीलातील घोटाळ्यामुळेही या कवितेतील कृत्रिमता सहज डोळ्यांत भरते. गिरीशांच्या ग्रामीण कवितेविषयी निष्कर्ष मांडताना रविकिरण मंडळाच्या कवितेतील रंजकतेतील एक सांकेतिक दृष्टी गिरीशांच्या जानपद कवितेत दिसते असे म्हटले आहे. १९२० नंतर गिरिश, यशवंत या रविकिरण मंडळातील कवींबरोबरच ना.घ.देशपांडे, वा.भ.बोरकर, भवानीशंकर पंडित, वा.भा.पाटक, वा.गो. मायदेव इ. नागर कवींनी ग्रामीण कविता कमी अधिक प्रमाणात लिहिली. केवळ हौसेखातर रुचिपालट म्हणून लिहिलेली कविता असे या कवींनी लिहिलेल्या ग्रामीण कवितेचे स्वरूप होते असे प्रा. सार्वेकर यांनी मत नोंदवले आहे.

तिसऱ्या प्रकरणात पां.श्री.गोरे, वी. रघुनाथ, ग.ह. पाटील, ग.ल. ठोकळ या समकालीन कवींच्या काव्याचा विचार केला आहे. 'वास्तवता, वर्ण्य विषयासंबंधी जिव्हाळा, अनुरूप भाषाशैली इ. वैशिष्ट्ये असलेली कवी गोरे यांची कविता अलक्षित राहिली याचे कारण तत्कालीन परिस्थिती आणि समीक्षकांचा एकूणच ग्रामीण कवितेकडे पाहण्याचा दृष्टिकोन यामध्ये सापडते' असा निष्कर्ष लेखकाने नोंदवला आहे. याला कारण रविकिरण मंडळाचा तो प्रभावाचा काळ होता. वाङ्मयेतिहासकारांनीही त्यांच्याकडे दुर्लक्षच केले अशी खंत व्यक्त केली आहे. वी. रघुनाथांच्या वास्तवदर्शी कविता त्यांच्या समकालीन कृतक ग्रामीण चित्रण करणाऱ्या जानपद कवितेच्या पार्श्वभूमीवर आपल्या वेगळपणाने उठून दिसतात हे त्यांचे वैशिष्ट्य लेखकाने नोंदवले आहे. 'स्वानुभवावर आधारित साध्या सरळ पद्धतीने साकार होणारी स्वतंत्र अशी ग.ह.पाटील यांची कविता आहे. या

कवितेतील ग्रामीण जीवन हे स्वानुभवावर आधारित असल्याने त्यांच्या समकालीन अन्य कवींप्रमाणे ते नटवे - फसवे नाही. वेगळा प्रयोग, टूम म्हणूनही ती लिहिली गेली नाही. ग्रामीण जीवनाचा सहज 'उत्स्फुर्त आविष्कार या कवितेत दिसतो' असे मत लेखकाने नोंदवले आहे. मात्र त्यांची कविता स्थूल वर्णनापलिकडे जात नाही ही मर्यादाही नोंदवली आहे. काय हो चमत्कार' हे जसे चमत्कृतीने परिपूर्ण असे चंद्रशेखरांचे काव्य आहे. त्याचप्रमाणे ग.ह.पाटील यांनी ज्यांना इंग्रजी मध्ये Idyll song's म्हणतात. अशा धर्तीच्या गस्तवाल्याची गीते लिहिली आहेत. जकातीच्या नाक्याचे रहस्य, लुटारूंनी म्हटलेले गाणे ह्या अशा प्रकारच्या त्यांच्या कवितां त्या दृष्टीने महत्त्वाच्या आहेत. त्यांचा उल्लेख लेखकाने करावयास हवा होता असे वाटते.

'ग्रामीण कवितेला प्रतिष्ठेचं स्थान मिळवून देण्यात फार मोठा वाटा ग.ल.ठोकळ यांचा आहे. त्यांनी सुगी हा जानपदगीतांचा प्रातिनिधिक संग्रह काढून मराठी कवितेत ग्रामीण काव्याला विशिष्ट स्थान मिळवून दिले हे त्यांचे ऋण लेखकाने नोंदवले आहे. मात्र त्यांच्या कवितेविषयी टीका करताना या कार्याबरोबरच श्रेष्ठ दर्जाची ग्रामीण कविता ठोकळांच्या हातून लिहिली गेली असती तर त्यांना ग्रामीण काव्येतिहासात अधिक मानाचे स्थान प्राप्त झाले असते. तत्कालीन इतर कवींप्रमाणेच त्यांचीही कविता रविकिरण मंडळाच्या परिधान किरण राहिली असे त्यांच्या कार्याचे व कवितेचे सामर्थ्य आणि मर्यादा लेखकाने व्यक्त केल्या आहेत.

चौथ्या प्रकरणात के. नारखेडे, सोपानदेव चौधरी व बहिणाबाई चौधरी यांच्या ग्रामीण कवितेवर प्रकाश टाकला आहे. के. नारखेडे यांचा 'शिवार' हा कवितासंग्रह. त्यांनी विपुल अशी ग्रामीण कविता लिहिली. कथाकाव्य, प्रेमकाव्य, व्यक्तिचित्रं अशा सर्वच प्रकारच्या कविता त्यांनी लिहिल्या. मात्र या ग्रामीण कविता लिहिताना ग्रामीण काव्यासाठी त्यांनी नागर भाषेचा आग्रह धरला. मात्र आपल्या काव्यासाठी संस्कृतप्रचुर नागर भाषा त्यांनी वापरली. त्यांच्या बऱ्याचशा कविता कथाप्रधान आहेत. त्यातही अद्भुततेला प्राधान्य आहे असे लेखकाने म्हटले आहे.

सोपानदेव चौधरी आपल्या काव्यगायनाने उभ्या महाराष्ट्राला परिचित होते. ग्रामीण कवितेतही शब्दचमत्कृतीतून विनोद निर्माण करणे हा प्रकार त्यांच्या कवितेत जाणवतो. त्यामुळे त्यांची कविता वास्तवही हरवून बसलेली दिसते. असे मत श्री. सार्वेकर यांनी व्यक्त केले आहे.

बहिणाबाई चौधरी यांची कविता १९५२ मध्ये पुस्तकरूपाने प्रकाशित झाली असली तरी ती त्याआधी लिहिली गेली आहे. 'लोकगीतांच्या अंगाने व संतांच्या जीवनदृष्टीत ग्रामीण जीवनाला आणि आत्मानुभवाला आविष्कृत करणारी त्यांची कविता ग्रामीण कवितेचे सर्व विशेष आपल्यात सामावून घेणारी कविता आहे' असे चांगले मत बहिणाबाईंच्या काव्याविषयी नोंदले आहे. कृषिजीवन, ग्रामव्यवस्था, प्रादेशिकता, अध्यात्मविचार, मानवी मनाचं सूक्ष्म दर्शन, जीवनविषयक तत्त्वज्ञान हे त्यांच्या कवितेचे विविध पैलू. कुठल्याही लिखित कवितेचे संस्कार न झालेल्या बहिणाबाईंनी अष्टाक्षरी ओवी छंदात बहुतांश कविता लिहिली. ती सुद्धा आपल्या खानदेशी

बोलीत. बहिणाबाई या निसर्गकन्याच. त्यांच्या कवितेचा विस्तृत आढावा लेखकाने घेतला आहे. जानपदकवितेअगोदर लिहिली गेलेली ही कविता जानपद काव्याचा काळ ओसरल्यावर प्रसिद्ध झाली हे ग्रामीण कवितेचे दुर्दैवच होय. ती लिहिली गेली तशी प्रसिद्ध झाली असती तर डॉ.आनंद यादव यांनी म्हटल्याप्रमाणे एकूणच जानपद कवितेला वेगळे वळण लागण्याची शक्यता होती. हे प्रा. सार्वेकरांनी केलेले विधान महत्त्वाचे आहे.

१९६० सालापर्यंतची ग्रामीण कविता आणि त्यानंतरची कविता याचे गुणविशेष नोंदताना कैलास सार्वेकर यांनी ग्रामीण कवितेच्या प्रेरणा व स्वरूपामध्ये अंतर्बाह्य झालेल्या बदलाची नोंद केली आहे. आशय आणि अभिव्यक्तिमध्येही हा बदल स्पष्ट जाणवतो आहे. ते म्हणतात, 'रविकिरण मंडळ काळातल्या जानपद काव्यातली कृत्रिमता, नाट्यात्मता, नटवी भाषा या ऐवजी पुढील कालखंडातील कवितेत आत्माविष्कार, काव्यानुभावातले सूक्ष्म बारकावे ग्रामजीवन आणि बोलीतील प्रतिमांनी ही कविता समृद्ध होण्यास मदत झाली. असे एकूण या पुढील कालखंडातील कवितेविषयी लेखकाने वक्तव्य केले आहे.

साठोत्तर ग्रामीण कविता या तिसऱ्या भागात लेखकाने आनंद यादव, ना.धों.महानोर, विठ्ठल वाघ यांवर स्वतंत्र प्रकरणे लिहिली आहेत.आनंद यादव यांच्या कवितेपासून ग्रामीण कवितेचे चित्र स्पष्टपणे बदलताना दिसते म्हणजे ग्रामीण कवितेने एक वेगळे वळण घेतले. खरंखुरं ग्रामीण वास्तव त्यातून चित्रित होतं. 'हिरवे जग' मधील कविता नेमक्या शब्दात चित्रित झाल्या असून अस्सल, ग्रामीण भाषेचा त्यातील अलंकार आणि प्रतिमांचा वापर हे या कवितेच्या अभिव्यक्तीचे वळण आहे. असे आनंद यादवांच्या कवितेविषयीचे प्रतिपादन लेखकाने केले आहे. तर ना.धों.महानोर यांची कविता बालकवी-बोरकर-देशपांडे अशी रोमॅंटिक प्रवाहाच्या दिशेने आविष्कृत होताना दिसते आणि निरीक्षण नोंदवून निसर्गप्रतिभातून स्त्री-पुरुषातील परस्परांमधील स्त्रीसौंदर्याकर्षण ही कविता चित्रित करते. पण ग्रामकवितेपेक्षा ती तुलनेने जास्त रोमॅंटिक आहे असे निरीक्षण लेखक नोंदवतात. विठ्ठल वाघ यांची कविता सौंदर्यानुभव आणि वास्तवानुभव अशी दोन्ही अंगानी अविष्कृत होते. ग्रामीण प्रेम सौंदर्यानुभवाबरोबरच शेतकरी, कष्टकरी, त्यांचे दारिद्र्य, भ्रष्ट राजकारण, ग्रामीण जीवन यांचा सामुहिक व प्रातिनिधिक आविष्कारही कविता करते असे या कवितेचे वैशिष्ट नोंदवले आहे. 'विठ्ठल वाघांची कविता म्हणजे लोकानुभवाला लोकजीवन, लोकभाषा आणि लोकसंस्कृती यांच्या अंगाने आविष्कृत करणारी लोककविता आहे' असे एका वाक्यात लेखकांनी विठ्ठल वाघांच्या कवितेचे वैशिष्ट्य नोंदविले आहे.

१९८० नंतर पुढे अनेक ग्रामीण कवींचे काव्यसंग्रह मोठ्या संख्येने प्रसिद्ध होताना दिसतात. अशा अनेक कवींच्या काव्यांचा थोडक्यात परामर्ष घेतलेला आहे. ग्रामीण कवितेतील बालकाव्याचा धागा आणि विडंबनपर कविता यावरही ओझरता दृष्टीक्षेप टाकला आहे.

चौथ्या भागात ग्रामीण कवितेवरील समीक्षेचा विचार करताना १९२० ते ५५ या काळातील

ग्रामीण कवितेवरील काव्यसमीक्षा आणि १९५५ ते १९९० या कालखंडातील ग्रामीण काव्याचे स्वरूप आणि समीक्षा असे दोन भाग सोयीसाठी केले आहेत. याविपयींचे निष्कर्ष नोंदवताना एक दोन महत्त्वाचे वाटले. समीक्षकाकडून ग्रामीण काव्याची उपेक्षा झाली असे प्रा.सार्वेकर यांना वाटते. तसेच प्रस्थापित समीक्षकांची ग्रामीण कवितेवद्दलची 'एक कसहीन दुय्यम परंपरा' अशी तुच्छतादर्शक मानसिकता कायम राहिलेली दिसते. ग्रामीण साहित्यातही ग्रामीण कविता अधिक दुर्लक्षित राहिली आहे असे प्रा. सार्वेकर यांना वाटते याची कारणे शोधायला हवीत.

एकूण या कालखंडातील ग्रामीण कवितेची वैशिष्ट्ये आणि मर्यादा नोंदवताना प्रा.सार्वेकर यांनी अनेक मुद्दे मांडले आहेत. त्यातील काही महत्त्वाचे वाटतात. काही विवेचनाच्या ओघात आलेही आहेत. १९६० नंतरच्या कालखंडात आनंद यादव, ना. धों. महानोर आणि विठ्ठल वाघ या तीन प्रमुख ग्रामीण कवींनी मराठी ग्रामीण कवितेवर वेगवेगळा ठसा उमटवला. काव्य प्रकारातील प्रयोगशीलता ग्रामीण कवितेत फारशी दिसत नाही. १९७७ नंतर ग्रामीण कवितेत बोलीभापेचा वापर मोठ्या प्रमाणात होताना दिसतो. ग्रामीण कथा-कादंवरीखालोखाल कविता मोठ्या प्रमाणावर लिहिली गेली पण समीक्षेच्यावावत ही कविता अलक्षित राहिली.

स्त्रियांचे दुःख, स्त्री-जीवनाची कथा यांचे चित्रण ग्रामीण कवितेत हवे त्या प्रमाणात आले नाही. ग्रामीण कवींमध्ये कवयित्रींची संख्या अपवादात्मक दिसते. त्याचे कारणही लेखकाने नोंदवले आहे. कारण ग्रामीण भागात स्त्री शिक्षणाचे प्रमाण अजूनही अल्प आहे. मराठी कवितेतील दुर्वोधतेचा पाडाव करून तिच्यात सुवोधता आणली असे ग्रामीण कवितेविपयी कार्लेकरांनी मत नोंदवले आहे. ग्रामीण वोलीच्या वापराने मराठी साहित्य आणि मराठी भाषा - समृद्धीत मोलाची भर घातली आहे. असे प्रा.सार्वेकर यांनी म्हटले आहे.

काही गोष्टी या अभ्यासाच्या दृष्टीने नोंदवाव्याशा वाटतात. ना.घ.देशपांडे यांच्या शीळ व भिंगरी या कवितेचा नुसता उल्लेख झाला. त्या कवितांवर विस्तृत टिप्पणी द्यायला हवी होती असे वाटते. महत्त्वाच्या ग्रामीण कवींच्या प्रादेशिकतेचे वैशिष्ट्य नोंदवायला हवे होते. तसेच ते ज्या ग्रामीण परिसातून आले. विदर्भ, मराठवाडा, कोंकण, गोवा आदि त्याची नोंद द्यायला हवी होती असे वाटते. त्यातून प्रादेशिकतेची काही वैशिष्ट्ये त्यांच्या ग्रामीण कवितेत दिसतात का ? याचाही शोध घेता आला असता. एरवी अत्यंत अभ्यासपूर्ण परिश्रमपूर्वक, विपयाचा सर्वांगीण अभ्यास या ग्रंथात मांडला आहे.

*(मराठी ग्रामीण कवितेचा इतिहास - प्रा. कैलास सार्वेकर,*
*मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. १९९९. किंमत रु.२००. पृष्ठे २९८.)*

❑❑

**डॉ. मंदा खांडगे**
*अमलताश, २४ ऋणानुवंध, डी.पी.रोड, औंध, पुणे ४११ ००७*



अनुक्रमणिका

# प्राचीन मराठी साहित्यातील स्त्रीचा चिंतनगर्भ लालित्यपूर्ण आलेख

O

**प्रा. आरती दातार**

'प्राचीन मराठी साहित्यातील स्त्रीरूप' हा डॉ. लीला दीक्षित यांचा प्राचीन मराठी साहित्यातील स्त्रीचा वेध घेणारा महत्त्वपूर्ण ग्रंथ आहे. महानुभाव ते रामदास या सुमारे चारशे-साडेचारशे वर्षातील समग्र वाङ्मयाचा अभ्यासपूर्ण शोध घेऊन हा ग्रंथ डॉ.लीला दीक्षित यांनी साक्षेपीपणाने सिद्ध केला आहे. महानुभाव वाङ्मय, संतवाङ्मय आणि पंडितीकाव्य या तीनही वाङ्मय प्रवाहांचा सूक्ष्म अभ्यास करून, निरीक्षण आणि चिंतनातून परिणामकारकरित्या स्त्रीरूपाचा मार्मिक आलेख रसिकांपुढे मांडला आहे. संशोधनाची शिस्त, नेमके संदर्भ आणि अर्थपूर्ण तळटीपा या वैशिष्ट्यांमुळे ग्रंथ काटेकोर उतरला आहे.

ग्रंथाची सुरवात 'प्रस्तावना' या नावाने होते. लेखिकेने अत्यंत विचारपूर्वक प्रस्तावनेऐवजी 'आरंभिक' असा शब्द वापरला आहे. 'आरंभिक' या प्रकरणात वेद-वाङ्मयापासून ते ग्रंथकालापर्यंत स्त्रीरूपाचा धावता आढावा घेतला आहे. या बरोबरच लेखिकेने या ग्रंथाची मांडणी कोणत्या वैचारिक दृष्टीने केली आहे. याचे मार्मिक विवेचन केले आहे. त्यामुळे 'आरंभिक' हे प्रकरण ग्रंथवाचनासाठी रसिक वाचकाला दिशादर्शकासारखे वाटते.

पहिल्या प्रकरणात संतकवयित्रींच्या जीवनाचा समग्र आलेख उलगडला आहे. महदंबा या आद्य कवयित्रीचे महत्त्वाचे वाङ्मय असणारे धवळे याविषयीचे चिंतन नवीन तर आहेच पण यातून लेखिकेने केलेले निर्णयात्मक विवेचनही निराळी दृष्टी देते. लेखिका म्हणते - 'शीशुपाल वंदिसा(शा)ळू या दोन शब्दांमधून महदंबेने रुक्मिणीची वेदना नेमकेपणाने अल्पाक्षर रूपाने उभी केली आहे. नको असलेल्या व्यक्तीशी होणारे मीलन ही स्त्रीची वंदिशाला नव्हे काय ?'

महदंबेच्या काव्यरुपाविषयी लेखिका एक वाङ्मयविषयक मत मांडताना म्हणते - 'लावण्य-सागरू कृष्ण... तुमचे उचित' या शब्दातील विलक्षण उत्कटता कदाचित महदंबेला ओवी छंदात बांधून ठेवता आलेला नाही. यमकअनुप्रासाचे बंध इथे सहजपणे गळून पडलेले आहेत. मुक्तछंद या रचनेची महदंबेला कल्पनाही नसताना तिच्या लेखणीने मुक्तछंदाची वाट अनुसरली आहे. मराठी साहित्यात मुक्तछंद ही रचना अंगीकारणारी महदंबा ही पहिली कवयित्री असे म्हणावे लागते. याच प्रकरणात मुक्ताबाईच्या जीवित कार्याचे वेगळेपण सांगितले आहे. नामयाचि जनी, नामदेवपरिवारातील गोणाई, राजाई आदि कवयित्री, कान्होपात्रा, बहिणाबाई, वेणाबाई या सर्वच संतकवयित्रींच्या संदर्भात लेखिकेचे मुक्त चिंतन वाचताना संतस्त्रियांचा अभिमान वाटतो.

प्रस्तुत ग्रंथाची अनुक्रमणिका बोलकी आहे. या अनुक्रमणिकेवरून स्त्रीजीवनाचा विकास उलगडत जातो. कन्या, पत्नी, माता या तीन प्रकरणातून स्त्री म्हणजे मूर्तिमंत संस्कृती असा संस्कार मनावर होत जातो - आणि स्त्रीजीवन उलगडले जाते. याचा अर्थ स्त्री म्हणजे गुणांची

पुतळी असा नाही, तिच्यात नक्कीच दोप होते. 'पत्नी' या प्रकरणात 'स्त्रीचे दोष' या उपशीर्षकाखाली स्त्रीच्या अंगी असलेल्या दुर्गुणांचे दर्शन वाङ्मयीन पुरावे देऊन दाखविले आहेत. यात कजाग, भांडखोर, कुरकुरी, आळशी, अलंकाराचा अनाठायी लोभ असलेल्या स्त्रीचे चित्र रेखाटले आहे.

'विधवा' आणि 'वेश्या' ही दोन स्वतंत्र प्रकरणे आहेत. स्त्रीचे हे दोन वर्ग अत्यंत पतित – असा समाजाचा दृष्टिकोण आहे. 'विधवा' या प्रकरणात सतीची चाल, समाजाकडून होणारी सक्ती. विधवेचे करुण जीवन अत्यंत सहृदयतेने पण वस्तुनिठ पुराव्यांच्या आधारे रेखाटले आहे. महानुभावियांनी विधवा स्त्रीकडे उदार दृष्टीने बघून, स्त्रियांना सामाजिक बळ देऊन आपल्या पंथात सामावून घेतले. पण भागवतधर्मामध्ये चित्र वदललेले दिसते. नाथांसारख्या उदारचरित महात्म्याने विधवेचे मुख पाहू नये असा मांडलेला विचार अयोग्य आणि आश्चर्यकारक वाटतो - असा निर्वाळा लेखिकेने दिला आहे.

त्या काळात स्त्रीला स्वतंत्र्य व्यक्ती म्हणून मान्यता नव्हती. त्यामुळे सामाजिक आणि धार्मिक जीवनाचा एकत्रित विचार केला आहे. आज ज्या अर्थाने आपण स्त्रीच्या सामाजिक जीवनाचा विचार करतो, तसं सामाजिक जीवन ग्रंथकाळात असणं शक्य नाही. धार्मिक कारणांमुळे स्त्री पमाजात मिसळत होती. तेव्हाचे स्त्रीजीवन व्रतवैकल्ये आणि सणवार यांनी वंदिस्त झाले होते. त्री जीवनात आत्म-विकासाला कुठेही अवसर नव्हता. तरीसुद्धा स्त्रीच्या विविध कलाआणि खेळ याचा स्वतंत्र आलेख या ग्रंथात वाचायला मिळतो. हा आलेख हृद्य वाटतो. कवड्या किंवा पट खेळणे असा अपवादात्मक बैठ्या खेळांचा उल्लेख येथे आला आहे. स्त्रीची चपलता - लवचिकता सांगणारे खेळ सांगितले आहेत. फुगडी, झिम्मा, फेर, पिंगा हेच खेळ प्रामुख्याने स्त्रिया खेळत असत. तिच्या ठिकाणी कवित्वशक्ती होती. रांगोळी, शिवणकला, कशिदा यासारख्या कलेत स्त्रिया पारंगत होत्या. वादन-संगीत-नृत्य या तिन्ही कला स्त्रियांना अवगत नव्हत्या. ती मिरासदारी होती फक्त वारांगनेची. त्यामुळे सर्वसामान्य स्त्रीला समाजाने या कलांपासून वंचित केले. तरीही या ग्रंथात नृत्यकलेचे तपशीलासह वर्णन आहे. भास्करभट्टाच्या 'शिशुपालवध मध्ये कृष्ण-गोपी यांच्या क्रीडेच्या अनुपंगाने हा नृत्याचा भाग आला आहे. भास्करभट्टाला नृत्यकलेविषयी ज्ञान असावे. मूळ भागवतात एका श्लोकात आलेल्या कथेचा विस्तार करताना नृत्यकलेविषयी समग्र माहिती आली आहे. चेहऱ्यावरील भाव, मुद्रा, हस्तमुद्रा, पदन्यास यांचे सविस्तर विवेचन आले आहे. त्या अर्थी नृत्यकला अत्यंत विकसित रुपात ग्रंथकाळात असल्याची ग्वाही मिळते.

स्त्रीच्या वेपभूपेविपयीचे ग्रंथातील तपशील पाहून आपण थक्क होतो. स्त्रीप्रसाधनाचे साहित्य, तांवूलाची ओठ रंगविण्यासाठीची योजना, गोंदण, मेंदी, वेण्यांचे विविध प्रकार, नागगोंड्याची वैशिष्ट्यपूर्ण वेणी, केशभूपेसाठी फुलांचा वापर, वस्त्रांची रंगसंगती, शिरोभूपणे, कंठभूपणे, कर्णभूपणे आणि त्यामधील रत्ने, हिरे, माणिक, मोती यांचे उल्लेख पानोपानी आहेत. जिज्ञासूंना मूळातूनच हा ग्रंथ वघावा लागेल हे नक्की. सूक्ष्म निरीक्षण, अभ्यासवृत्ती, तपशील मांडण्याची हातोटी यांमुळे साडेचारशे वर्षांतील स्त्रीजीवनाचा समग्र आलेख रेखीवपणे मांडला असल्याचं लक्षात येतं.



अनुक्रमणिका



## डॉ. लीला दीक्षित

*एम.ए.पीएच.डी (पुणे विद्यापीठ)*

निवृत्त प्राध्यापिका,

एस्.एन्.डी.टी.गृहविज्ञान महाविद्यालय,

पुणे.

ग्रंथसंपदा :

- कादंबऱ्या - १) गोत, २) चंदनवेल, ३) स्वामी अपरान्ताचा
- समीक्षा - प्राचीन मराठी साहित्यातील स्त्रीरूप (महानुभाव ते रामदास)

बालसाहित्य : एकूण ३५ पुस्तके

- कथासंग्रह - मुके मित्र, गमतीदार कथा, आजीची गोधडी, साखर आजोबा, श्रीफल, सुमनकथा आदि २० कथासंग्रह.
- कविता - १) मजाच मजा, २) गम्मत गाव.
- बालकादंवरी - १) धीरू, २) टिल्लोजी, ३) मैत्री
- बालनाटुकले - फुलांना मिळाले रंग

विशेष पुरस्कार :

१) गम्मतगाव (कविता) महाराष्ट्र राज्य पुरस्कार (१९८१) - भा.रा.तांबे पारितोषिक रु.२ हजार.

२) अक्षय शिदोरी (कथा) इचलकरंजी, स्मृति ट्रस्ट बालसाहित्य पुरस्कार (१९८५)

३) टिल्लोजी -
- दयार्णव पुरस्कार (१९९७) मराठी बालकुमार साहित्य संमेलन.
- आनंद मासिक कादंवरी प्रथम पुरस्कार (१९९६) रु. एक हजार.

४) मुके मित्र -
- शारदा पुरस्कार (निवेदिता प्रतिष्ठान) (१९९९) रु. एक हजार.
- विनायक कोंडो ओक पुरस्कार (इ.स.२०००) म.सा.परिषद पुणे. रु. तीनशे.
- वा.गो.आपटे पुरस्कार. मराठी बालकुमार सा.संमेलन इ.स. २०००
- इंदिरा गो.कुलकर्णी पुरस्कार (इ.स.२०००) सा. प्रेमी भगिनी मंडळ रु. १ हजार.
- शशिकला आगाशे राज्यपुरस्कार रु. अकरा हजार (विभागून) बुलढाणा.

५) मैत्री - सर्वोत्कृष्ट कादंबरी पुरस्कार - जोशी पुरस्कार. मराठी बालकुमार (इ.स.२०००)

६) कै.ग.ह.पाटील - जीवनगौरव पुरस्कार - परिवर्तन संस्था (औरंगाबाद) रु. एक हजार.

७) मुक्ताई पुरस्कार - प्राचीन मराठी साहित्यातील स्त्रीरूप (महानुभाव ते रामदास) चेतश्री प्रकाशन. अमळनेर (२००१)

८) पुणे महानगरपालिकेतर्फे बालसाहित्य योगदानाबद्दल विशेष पुरस्कार व सन्मानचिन्ह (१९९५)

इतर :
- आकाशवाणी, मुंबई दूरदर्शन बालचित्रवाणी सहभाग
- विविध वृत्तपत्रे, मासिके, दिवाळी अंकातून लेखन
- शारदीय, वासंतिक आदि व्याख्यानमालेत महाराष्ट्रात अनेक ठिकाणी सहभाग.



अनुक्रमणिका

संतसाहित्यात आलेल्या स्त्रीनिंदेचा वेगळा परामर्ष 'स्त्रीचे सामाजिक आणि धार्मिक जीवन' या प्रकरणात घेतला आहे. स्त्रीनिंदेविपयी चिंतन करताना लेखिका म्हणते -

'वस्तुतः स्त्रीचे लावण्य आणि तिचे 'कामिनी' रूप ही इतकी निपेधार्ह गोप्ट नाही. स्त्रीचे हे रूप तारुण्यामध्ये पुरुपाला एक प्रेरक शक्ती आहे. हे कोण अमान्य करेल ? परंतु स्त्रीच्या सौंदर्याला आणि लावण्याला ती स्वतः जवावदार नसताना तिचे सौंदर्य मोहाचे द्वार कसे? तिचे सौंदर्य पाहताच जर पुरुप आपल्या कर्तव्यापासून, ध्येयापासून च्युत होत असेल तर ती पुरुपाच्या मनाची कमकुवत व पराभूत मनोवृत्ती म्हटली पाहिजे. त्यावद्दल पुरुपाच्या स्खलनशील, दुर्वल मनोवृत्तीला दोप देण्याऐवजी हे सौंदर्य मिरवणारी स्त्रीच येथे आवेशाच्या भरात शिव्याशापाची वाटेकरी वनते. संतसाहित्याचा रोख लक्षात घेऊनही संतांनी केलेली ही अतिरिक्त स्त्रीनिंदा चिंतनीय वाटते. '(पृ. १७०)

स्त्रीनिंदेविषयीचा लेखिकेने घेतलेला हा धांडोळा मोठा लक्षणीय वाटतो. त्यासाठी मूळ ग्रंथ वाचायला हवा.

लेखिकेने अथक प्रयत्न आणि अभ्यास करून जमविलेली माहिती, या माहितीला मिळालेली मांडणीची जोड आणि अभ्यासपूर्ण चिंतन यामुळे ग्रंथ वैशिष्ट्यपूर्ण झाला आहे. या ग्रंथात अभिनिवेश नाही. कधी कधी संतसाहित्याचे संदर्भात सांप्रदायिकतेचा अभिनिवेश येतो, तसाही या ग्रंथात नाही. अकारण विरोधाचा सूरही नाही. प्रसार आणि प्रचार यापासून अलिप्त असलेले हे वास्तव दर्शन आहे. विचारांचा समतोल या ग्रंथात जाणवतो. वास्तविक हा वैचारिक ग्रंथ आहे. तरी सुद्धा लेखिकेची साधी, सहजसुंदर लालित्यपूर्ण शैली, विपय थेट आपल्या मनाला नेऊन भिडविते.

'उपसंहार' म्हणजे समग्र ग्रंथाचा निर्णयात्मक आढावा असतो तसा तो असणे जरूरीचे आहे. या ग्रंथात उपसंहार अत्यंत त्रोटक वाटतो. असं का ? हा प्रश्न मनात येतो ग्रंथाला विपयसूची हवी होती. अशा सूचीमुळे अभ्यासकांची सोय होते.

स्त्रीजीवनविपयक अनेक प्रकारांनी अनेक मितीने लेखन आजवर झाले आहे. त्यामध्ये 'प्राचीन मराठी साहित्यातील स्त्रीरूप' या ग्रंथाची मौलिक भर पडली आहे हे नक्की. ग्रंथाचे मुखपृष्ठ देखणे आहे. डॉ. लीला दीक्षित यांचे 'प्राचीन मराठी साहित्यातील स्त्रीरूप' हे स्त्रीजीवनविपयक मौलिक लेखन म्हणून मराठी साहित्याला नोंद घ्यावी लागेल. त्यासाठी लेखिकेचे मन:पूर्वक अभिनंदन करणे उचित होईल.

*प्राचीन मराठी साहित्यातील स्त्रीरूप (महानुभाव ते रामदास)*
*डॉ. लीला दीक्षित. गोकुळ मासिक प्रकाशन, प्रथमावृत्ती जुलै २०००, पृष्ठे २४८. किंमत रु. २००/-*

❑❑

**प्रा. सौ. आरती दातार**
८२४ ड, शिवाजीनगर, चिंतामणी, पुणे ४११ ००४ दूरध्वनी - ५६५२३७२



अनुक्रमणिका







